# मुक्तिपथ

## ( धम्मपद - मराठी अनुवाद)



|| नमो तस्स भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस्स ||

# मुक्तिपथ

## (धम्मपदाचा मराठी अनुवाद)

- तिपिटक - सुत्तपिटक - खुद्दकनिकायो - धम्मपदं -


: अनुवादक :

**अशोक तपासे**

पाली भाषा मुक्त अभ्यासक

**हर्षदा तपासे**

MA(Marathi), MA(Pali) - Mumbai University

|| **भवतु सब्ब मंगलम्** ||

हे पुस्तक निःशुल्क वितरणासाठी प्रकाशित करण्यास अनुवादक लेखकांची कोणतीही हरकत नाही परंतु खालील पत्त्यावर तसे आगाऊ कळवुन परवानगी आवश्यक आहे.

The Translator Authers have no objection to publish this Book for free distribution, but written permission is solicited from below mentioned address.

* * * * * * * *


**अशोक तपासे**

४०४, माधव टॉवर, बिल्डींग ६८, शान्ती पार्क,

मिरा रोड, जिल्हा ठाणे, महाराष्ट्र राज्य, भारत.

डाक अनुक्रमांक - ४०१ १०७.

☎ ०२२ २८११०५००

✆ ०९९६९११२११३

*Ashok Tapase*

*404, Madhav Tower, Bldg. 68, Shanti Park,*

*Mira Road, District –Thane,*

*Maharashtra State, India.*

*PIN– 401 107*

☎ 022 28110500

✆ 09969112113


सदर पुस्तक खालील संगणक-महाजाल पत्त्यावर उपलब्ध आहे.

This Book is available on Internet at the address below :-

**http://www.buddhistelibrary.org/library/view.php?adpath=312**

धम्मपद न वाचताही
धम्मपदात सिद्धार्थ गौतम बुद्धांनी
विदीत केलेले जवळ-जवळ सर्वच जीवन सिद्धांत
ज्यांनी केवळ तथागतांवरील प्रज्ञापूर्ण श्रद्धेने
आपल्या जीवनात अनुसरले,
स्वत:चे जीवन सफल केले,
आणि फक्त कुटुंबियच नव्हे तर सर्व परिवारा समोर
एक आदर्श निर्माण केला,
त्या आमच्या आणि सर्व तपासे परिवाराच्या
दीपस्तंभस्वरुप आण्णांस
त्यांच्या अमृतमहोत्सवा प्रित्यर्थ,
धम्मपदाच्या अनुवादाचे
आमचे सारे प्रयास समर्पित.

अशोक - हर्षदा
भाद्रपद १७, बुद्धाब्द २५५५ अर्थात २८ सप्टेंबर २००७

माता यथा नियं पुत्तं, आयुसा एकपुत्तमनुरक्खे ।
एवम्पि सब्ब भुतेसु मानसं भावये अपरिमाणं ॥

- सुत्तपिटक - खुद्दकनिकाय
- खुद्दकपाठ - ९, मेत्तसुत्तं - ७

माता स्वताच्या पुत्राचे, एकुलत्या पुत्राच्या आयुष्याचे रक्षण करते,
तसाच अपरिमित भाव सर्व प्राणिमात्रांसाठी मनात ठेवावा.

|| नमो तस्स भगवतो अरहतो सम्मासम्बुद्धस्स ||

# मनोगत

विश्वाची आजची परिस्थिती पाहून अनेकदा अनेकांना असे वाटते, "युद्ध नको बुद्ध हवा". पण बुद्ध म्हणजे नक्की काय ? फारच कमी लोक या प्रश्नाचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न करताना आढळतात. कोणाला वाटते, बुद्ध म्हणजे अहिंसा तत्वज्ञान. या तत्वज्ञानाच्या मार्गाने विश्वातली युद्धतत्वे नाहीशी होतील. अन्य कोणाला वाटते, बुद्ध हा एक धर्म आहे. या धर्मात लोकांना सुखाचा, मुक्तीचा मार्ग मिळेल. बुद्ध हा देवाचाच अवतार आहे असे मानणाऱ्यांची संख्याही कमी नाही आणि बुद्धाची उपासना करणारेही लक्षावधी आहेत. बुद्ध हे जीवन तत्वज्ञान आहे, शाक्यमुनी सिद्धार्थ गौतमाने अडिच हजार वर्षांपूर्वी सांगीतलेले, असे मानणारे तुलनेने कमीच आढळतील.

बुद्धाने हे तत्वज्ञान त्याच्या हजारो शिष्यांना उपदेशांतून सांगीतले. या हजारो शिष्यांनी ते जसे ऐकले तसे मुखोद्‌गत केले, अंगीकारले, त्याचा प्रचार आणि प्रसार केला. या प्रदीर्घ प्रक्रियेतून 'तिपिटक' उदयाला आले. विनयपिटक, सुत्तपिटक आणि अभिधम्मपिटक हे याचे तीन घटक. या तीन घटकांतून हे जीवन तत्वज्ञान मानवाच्या वेगवेगळ्या वैचारिक समुहांसाठी सांगीतले गेले. सामान्य जीवन शैलीचा त्याग करुन समाजापासून दूर विहरणाऱ्या समुहाचे जीवनतत्वज्ञान, सामान्य जीवन शैलीत सुखाचा शोध घेवु पहाणाऱ्यांचे जीवन तत्वज्ञान आणि शैली-निरपेक्ष पण तत्वचिंतन करणाऱ्या समुहाचे जीवन तत्वज्ञान. पण त्याचा मुळ गाभा मात्र एकच. विश्वातल्या वेदनेचे निवारण.

या तत्वज्ञानाचे सार, किंवा संक्षिप्त आशय शोधण्याचा प्रयत्न अनेकांनी केला. अभ्यासकांनी अभ्यास केला, चिंतकांनी चिंतन करुन सिद्धांत मांडले. अनुभवींना आपला असा मार्ग दिसला. कुणी महायानात आरुढ झाले तर कांही थेरांच्या मागे श्रावकयानातून पुढे जात राहिले. पण या बुद्धतत्वाशी अनुबंध ठेवून जगणाऱ्यांना या तत्वज्ञानाचे सार तिपिटकातच मिळाले. सुत्तपिटकातील खुद्दकनिकाय या खंडात असलेला धम्मपद नावाचा प्रदीर्घ पाठ. प्रदीर्घ अशामुळे की, यात चारशे तेवीस सुत्त सव्वीस वग्गात विभागली आहेत आणि संक्षिप्त अशामुळे की, धम्मपद हा तिपिटकाच केवळ एक पाठ आहे. धम्मपद हा संपूर्ण तिपिटकातला एक महत्वाचा पाठ आहे, तिपिटकातल्या सर्व तत्वज्ञानाचा संक्षिप्त आशय आहे. जीवन प्रवासाची सुरवात पंचशीलातून व्हावी, प्रज्ञेच्या प्रकाशातून धम्मपदाच्या मार्गाने या अनुसरण पथाची सांगता निर्वाणात व्हावी, हाच बुद्ध जीवन सिद्धांत.

बुद्धाने हा सारा उपदेश त्याकाळी सामान्य जनात प्रचलित असणाऱ्या पाली भाषेत सांगीतला. तिपिटक पाली भाषेत लिहीले गेले. सम्राट अशोकाच्या काळात बुद्ध-वचने लेण्यांमधील मोठमोठ्या शिला, धातुचे स्तंभ अशा कांही मध्यमांतून अक्षय स्वरुपात जतन केली गेली. अशोकाच्या काळात तसेच त्या आधि-नंतर पाली भाषेत कोरलेल्या शिलालेखांमुळे आणि स्तंभलेखांमुळे बुद्धवचनांचे जतन झाले. नुसते बुद्धवचनांचेच नव्हे तर पाली भाषेचेही जतन झाले. नंतरच्या काळात पाली भाषा लोप पावली. त्यामुळे आपोआपच पाली भाषा आणि बुद्ध तत्वज्ञान यांचे एक अतूट नाते निर्माण झाले. पाली या शब्दाचा अर्थच मुळी 'धम्माचे पालन (जतन) करते ती पाली' असा सांगीतला जातो.

धम्मपद वाचून ते समजण्यासाठी पाली भाषा शिकणे आवश्यक ठरते. अन्यथा धम्मपदाचा आपल्या मातृभाषेतला अनुवाद वाचणे क्रमप्राप्त होते. हा अनुवाद जर शब्दश: नसुन भावानुवाद असेल तर तो वचल्यानंतर हे वाचन धम्मपद समजण्यापूरतेच मर्यादित होते. कारण त्यातून पाली भाषेचे शब्दभांडार उघडत नाही. धम्मपदाचे (अनुवादाचे) वाचन केल्यावर जर अशी मर्यादा जाणविली तर ही फार मोठी उणीव होइल. धम्मपदाचा भावानुवाद वाचल्यानंतर मला स्वत:ला ही उणीव प्रकर्षाने जाणवली. त्यातूनच पाली शिकण्याची इच्छा निर्माण झाली, बळावत गेली.

तथागत बुद्धांवर आणि त्यांच्या तत्वज्ञानावर प्रज्ञापूर्ण श्रद्धा असणाऱ्या माझ्या तमाम बांधवांना धम्मपद समजावे, अनेक पाली शब्दांचा अर्थ ध्यानी यावा, आणि त्यातून पाली शिकण्याची इच्छा व्हावी, ती बळावी, याच साठी केलेला हा प्रयास. 'धम्माचे पालन (जतन) करते ती पाली' हे खरेच आहे तर पालीचे जतन म्हणजे बुद्ध तत्व-ज्ञानाचे, धम्माचे जतन हेही तितकेच खरे.

साधु ! साधु ! साधु !

- **अशोक तपासे**

**३० सप्टेंबर २००७**

## .... अधिक दोन शब्द

धम्मपदाचा अनुवाद करताना आलेले अनुभव आणि त्यातुन या अनुवादासंबंधी कांही उणे-अधिक वाचकांसमोर ठेवणे आवश्यक वाटते. त्याच बरोबर हा अनुवाद करण्यासाठी कांही संदर्भ घेतले, त्या सर्वांचा ऋणनिर्देश आवश्यक आहे. म्हणून मनोगत लिहील्यानंतरही हे अधिक दोन शब्द.

अनेक वेळा पाली सुत्तातील शब्दांना मराठी योग्य प्रतिशब्द शोधुन त्यातुन आभिप्रेत अर्थाची जुळवणी करणे तितकेसे सोपे नव्हते. म्हणून अनेक ठिकाणी कांही अधिक शब्द टाकुन सार्थ वाक्ये तयार केली. हे अधिकचे शब्द मुळ पाली सुत्तात नसल्याने अनुवादात हे शब्द कंसात लिहीले आहेत. कांही ठिकाणी मुळ पाली शब्दांच्या मराठी प्रतिशब्दातुन आभिप्रेत अर्थाची जुळवणी करणे कठीण होते. अशा ठिकाणी एकाच पाली शब्दासाठी दोन प्रतिशब्द लिहावे लागले. एक शब्दार्थ तर दुसरा भावार्थ. अशा ठिकाणी देखील दोहों पैकी एक शब्द, शक्यतो भावार्थ, कंसात लिहीला आहे. कांही ठिकाणी मराठी वाक्यरचना, मुळ पाली सुत्ताशी साधर्म्य ठेवण्यासाठी, तुटक झाली. कांही ठिकाणी मराठी वाक्य रचनेत क्लिष्टता आली. पण प्रत्येक वेळी मुळ पाली शब्दांचे अर्थ आणि संपुर्ण पाली सुत्ताचा भावार्थ अबाधित ठेवण्याचा प्रयत्न केला. या साऱ्या प्रयत्नातुन झालेल्या, या आनुवादातुन धम्मपदाचा अभिप्रेत अर्थ आपणास व्यवस्थित समजला तर ही आपली धम्मपदाप्रतिची प्रज्ञापुर्ण श्रद्धा, धम्म-सेवेत आमची भावांजली. पण असे होण्यात तसुभरही उणीव भासली तर ते सर्वस्वी आमचे उणेपण.

हा अनुवाद साकारताना आदरणीय **डॉ. भदन्त आनंद कौसल्यायन** यांनी लिहीलेल्या हिन्दी अनुवादाचा, आणि तिबेटचे आदरणीय भन्ते **डॉ. वङ्छुग दोरजे नेगी** यांनी लिहीलेल्या, अठ्ठकथासह-धम्मपदाच्या हिन्दी आनुवादाचा संदर्भ घेतला. तसेच श्रीलंकेचे आदरणीय **भन्ते वेरगोडा सारदा महाथेरो** यांनी, धम्मपदातील प्रत्येक सुत्तातील शब्दार्थासह लिहीलेल्या अठ्ठकथासह-धम्मपदाच्या इंग्लीश अनुवादाचाही संदर्भ घेतला. या तीनही महानुभावांनी केलेले कार्य आम्हास प्रेरणादायी ठरले. धम्मपदाची मुळ पाली संहिता आदरणीय **विपश्यनाचार्य सत्यनारायण गोएंका गुरुजी** आणि त्यांच्या शिष्यांनी साकारलेल्या तिपीटकाच्या संगणकीय आवृत्तीतुन अभ्यासता आली. या सर्वांच्या ऋुणातुन उतराई होणे केवळ अशक्यच. म्हणुन हा फक्त ऋणनिर्देश.

**-अशोक तपासे.**

**- हर्षदा तपासे.**

फुट्ठस्स लोक धम्मेहि, चित्तं यस्स न कम्पति।
असोकं विरजं खेमं, एतं मङ्गलमुत्तमं॥

- सुत्तपिटक - खुद्दकनिकाय
- खुद्दकपाठ - ५, मङ्गलसुत्तं - ११

लोक-स्वभावाने* भरुन जाऊनही चित्त कंपित होत नाही,
शोकरहीत, निर्मळ व शांत रहाते, हेच उत्तम मंगल होय.

* सुख आणि दुःख, यश आणि अपयश,
निंदा आणि स्तुती, लाभ आणि क्षती,
हे आठ लोक-स्वभाव होत.

# क्रम सूचि



---

वनप्पगुम्बे यथ फुस्सितग्गे, गिम्हान मासे पठमस्मिं गिम्हे।
तथुपमं धम्मवरं अदेसयि, निब्बानगामिं परमं हिताय।
इदम्पि बुद्धे रतनं पणीतं, एतेन सच्चेन सुवत्थि होतु॥

- सुत्तपिटक - खुद्दकनिकाय
- खुद्दकपाठ - ६, रतनसुत्तं - १३

ग्रीष्माच्या पहिल्या महिन्याच्या (वसंत ऋतुच्या) उष्म्याने,
जंगल-झाडी प्रफुल्ल व्हावी, त्याप्रमाणे,
निर्वाणाकडे जाणाऱ्या, परम हितकारी, श्रेष्ठ जीवन-सिद्धांताचा
उपदेश केला, ते, बुद्ध हे श्रेष्ठ रत्न आहे,
या सत्याने तुमचे कल्याण होवो.

मनोपुब्बङ्गमा धम्मा मनोसेट्ठा मनोमया।
मनसा चे पदुट्ठेन भासति वा करोति वा।
ततो'नं दुक्खमन्वेति चक्कं'व वहतो पदं ॥१॥

स्वभावाच्या पुढे मन असते, मन (सर्व)श्रेष्ठ आहे,
विकृत मनाने बोलती वा कृती करती तेंव्हा
त्याच्या मागे दुक्ख असे येते जसे (बैलाच्या) पावलांमागे चाक जाते.(१)

मनोपुब्बङ्गमा धम्मा मनोसेट्ठा मनोमया।
मनसा चे पसन्नेन भासति वा करोति वा।
ततो'नं सुखमन्वेति छाया' व अनपायिनी ॥2॥

स्वभावाच्या पुढे मन असते, मन (सर्व)श्रेष्ठ आहे,
प्रसन्न मनाने बोलती वा कृती करती तेंव्हा
त्याच्या मागे सुख असे येते जशी सावली. (२)

अक्कोच्छि मं अवधि मं अजनि मं अहासि मे।
ये च तं उपनय्हन्ति वेरं तेसं न सम्मति ॥3॥

मला अपमानिले, माझा शेवट केला, मला जिंकले,
जे असे वैर धरतात, त्यांचे वैर शमत नाही. (३)

अक्कोच्छि मं अवधि मं अजनि मं अहासि मे।
ये तं न उपनय्हन्ति वेरं तेसूप सम्मति ॥४॥

मला अपमानिले, माझा शेवट केला, मला जिंकले,
जे असे वैर न धरतात, त्यांचेच वैर शमते. (४)

न हि वेरेन वेरानि सम्मन्तीध कुदाचनं।
अवेरेन च सम्मन्ति एस धम्मो सनन्तनो ॥५॥

वैराने वैर कधीही शमत नाही,
ते अवैरानेच शमते, असा पुर्वापार सिद्धांत आहे. (५)

परे च न  विजानन्ति मयमेत्थ यमामसे।
ये च तत्थ विजानन्ति ततो सम्मन्ति मेधगा॥६॥

त्यांचे नव्हे, आपण मरणारच आहीत हे जे जाणित नाहित,
त्यांचेच वैर शमते, आपण मरणारच आहीत हे जे जाणतात. (६)

सभानुपस्सिं विहरन्तं इन्द्रियेसु असंवुतं।
भोजनम्हि अमत्तञ्ञु कुसीतं हीनवीरियं।
तं वे पसहति मारो वातो रुक्खं'व दुब्बलं॥७॥

(फक्त) चांगलेच पहात फिरणारा, इन्द्रीयांवर ताबा नसलेला,
भोजनाची (योग्य) मात्रा न जाणणारा, निरुद्योगी, हिंमत हारलेला,
त्याला, भुलैया असे जिंकती, जसे वारा दुर्बल झाडाला (वाकवीतो).(७)

असभानुपस्सिं विहरन्तं इन्द्रियेसु सुसंवुतं।
भोजनम्हि च मत्तञ्ञुसद्धं आरद्धवीरियं।
तं वे नप्पसहति मारो वातो सेळं'व पब्बतं॥८॥

(फक्त) चांगलेच न पहात फिरणारा, इन्द्रीयांवर योग्य ताबा असलेला,
भोजनाची (योग्य) मात्रा जाणणारा, प्रयत्नशील, हिंमतवान,
त्याला, भुलैया जिंकु शकत नाही, जसे वारा शैल पर्वताला हलवू शकत नाही.(८)

अनिक्कसावो कासवं यो वत्थं परिदहेस्सति।
अपेतो दमसच्चेन न सो कासावमरहति॥९॥

मलयुक्त चित्ताने जो भगवी वस्त्र परिधान करतो तो,
सत्य व संयमाहून दूर गेलेला, भगवी वस्त्र धारण करण्यास लायक नाही. (९)

यो च वन्तकसावस्स सीलेसु सुसमाहितो।
उपेतो दमसच्चेन स वे कासावमरहति॥१०॥

जो दोषविरहीत आहे, शीलवान आहे, चांगला एकाग्रचित्त आहे,
सत्य व संयमा जवळ असणारा, तो भगवी वस्त्र धारण करण्यास लायक आहे.(१०)

**असारे सारमतिनो सारे चासारदस्सिनो ।**
**ते सारं नाधिगच्छन्ति मिच्छसङ्कप्पगोचरा ॥११॥**

सत्वहीनात सत्व पहाणारा, सात्विकात सत्वहीनता पहाणारा,
खोटे संकल्प पहाणारा (करणारा) सात्विकता प्राप्त करीत नाही. (११)

**सारञ्च सारतो ञत्वा असारञ्च असारतो ।**
**ते सारं अधिगच्छन्ति सम्मासङ्कप्पगोचरा ॥१2॥**

सात्विकतेतच सत्व पहाणारा, सत्वहीनतेत असत्व पहाणारा,
सम्यक संकल्प पहाणारा (करणारा) सात्विकता प्राप्त करतो. (१२)

**यथागारं दुच्छन्नं वुठ्ठी समतिविज्झति ।**
**एवं अभावित्तं चित्तं रोगो समतिविज्झति ॥१3॥**

जसे छतविरहीत घरात पाऊस आरपार जातो,
तसे अननुभवीच्या (मानवाच्या) मनात रोगाचा प्रवेश होतो.(१३)

**यथागारं सुच्छन्नं वुठ्ठी न समतिविज्झति ।**
**एवं सुभावित्तं चित्तं रोगो न समतिविज्झति ॥१४॥**

जसे चांगल्या छताच्या घरात पाऊस प्रवेश करित नाही,
तसे अनुभवीच्या (मानवाच्या) मनात रोगाचा प्रवेश होत नाही.(१४)

**इध सोचति पेच्च सोचति पापकारी उभयत्थ सोचति ।**
**सो सोचति सो विहञ्ञति दिस्वा कम्मकिलिट्ठमत्तनो ॥१५॥**

इथेही चिंतीत, मृत्योत्तरही चिंतीत, दुष्कर्मी दोन्हीकडे चिंतीत असतात,
ते केलेल्या कुकर्मांना पाहुन चिंतीत होतात, पीडीत होतात. (१५)

**इध मोदति पेच्च मोदति कतपुञ्ञो उभयत्थ मोदति ।**
**सो मोदति सो पमोदति दिस्वा कम्मविसुद्धमत्तनो ॥१६॥**

इथेही आनंदीत, मृत्योत्तरही आनंदीत, सत्कर्मी दोन्हीकडे आनंदीत असतात,
ते केलेल्या सत्कर्मांना पाहुन आनंदीत होतात, अधिक आनंदीत होतात. (१६)

**इध तप्पति पेच्च तप्पति पापकारि उभयत्थ तप्पति।**
**पापं मे कतंति तप्पति भीय्यो तप्पति दुग्गतिङ्गतो ॥१७॥**

इथेही तप्त, मृत्यीत्तरही तप्त, दुष्कर्मी दोन्हीकडे तप्त असतात,
ते केलेल्या कुकर्मांना पाहुन तप्त होतात, दूर्गतीकडे जातात. (१७)

**इध नन्दति पेच्च नन्दति कतपुञ्ञो उभयत्थ नन्दति।**
**पुञ्ञ मे कतन्ति नन्दति भीय्यो नन्दति सुग्गतिंगतो ॥१८॥**

इथेही प्रसन्न, मृत्यीत्तरही प्रसन्न, सत्कर्मी दोन्हीकडे प्रसन्न असतात,
मी सत्कर्म केले (या विचारांनी) प्रसन्न होतात, अधिक प्रसन्न होतात. (१८)

**बहुँपि चे सहितं भासमानो न तक्करो होति नरो पमत्तो।**
**दोपो व गावो गणयं परेसं न भगवा सामञ्ञस्स होति ॥१९॥**

पुष्कळ (ग्रंथ) वाचून तस्कर वा प्रमादी मानव (भाग्यवान, श्रमण होत नाही),
दुसऱ्यांच्या गाई मोजून गो-पालक भाग्यवान, श्रमण होत नाही. (१९)

**अप्पम्पि चे सहितं भासमानो धम्मस्स होति अनुधम्मचारि।**
**रागञ्च दोसञ्च पहाय मोहं सम्पजानो सुविमुत्तचित्तो।**
**अनुपादियानो इध वा हुरं वा स भागवा सामञ्ञस होति ॥२०॥**

थोडेसेच (ग्रंथ) वाचून सैद्धांतिक आचारणाने सदाचारी होतो,
राग, दोष, मोह त्यागून, सम्यक जाणिवेने, मुक्त चित्ताने,अनासक्त,
असा (मानव) भाग्यवान, श्रमण होतो. (२०)

**अप्पमादो अमत पदं पमादो मच्चुनो पदं ।**
**अप्पमत्ता न मीयन्ति ये पमत्ता यथा मत्ता ॥१॥**

अप्रमाद अमृत स्थान आहे, प्रमाद (बेपर्वा) मृत्यूचे स्थान आहे,
अप्रमादी मृत होत नाहीत, प्रमादी मृतवत असतात. (१)

**एवं विसेसतो ञत्वा अप्पमादम्हि पण्डिता ।**
**अप्पमादे पमोदन्ति अरियानं गोचरे रता ॥2॥**

अप्रमादाची ही विषेशता ज्ञानी जन जाणतात की,
अप्रमादात आर्याचरणी (सदाचरणी) प्रसन्न-मग्न असतात. (२)

**ते झायिनो साततिका निच्चं दळ्ह परक्कमा ।**
**फुसन्ति धीरा निब्बाणं योगक्खेमं अनुत्तरं ॥3॥**

ध्यानमग्न, जागृत, दृढ पराक्रमि, धीर (मानव)
यत्न-सिद्ध कल्याण, निर्वाण प्राप्त करती. (३)

**उट्ठानवतो सतिमतो सुचिकम्मस्स निसम्मकारिनो ।**
**सञ्ञतस्स च धम्मजीविनो अप्पमत्तस्स यसोभिवड्ढति ॥४॥**

उद्योगी, जागृत, सुकर्मी, विचारवंत, संयमाने व सदाचाराने
(धम्मा प्रमाणे) जगणाऱ्या, अप्रमादी (मानवा)ची यशवृद्धी होते. (४)

**उट्ठानेन'प्पमादेन सञ्ञमेन दमेन च ।**
**दीपं कयिराथ मेधावी यं ओघो नाभिकीरति ॥५॥**

अप्रमादी (मानव) उद्योगाने, संयमाने, शक्तिने,
प्रज्ञावान असे बेट उभारती, ज्यास पुर बुडवु शकत नाही. (५)

**पमादमनुयुञ्जन्ति बाला दुम्मेधिनो जना ।**
**अप्पमादञ्च मेधावी धनं सेट्ठ'च रक्खति ॥६॥**

अज्ञानी, दूर्बूद्ध (मानव) प्रमाद करतात,
प्रज्ञावान श्रेष्ठधनवत अप्रमादाचे रक्षण करतात. (६)

मा पमादमनुयुञ्जेथ मा कामरतिसन्थवं ।
अप्पमत्तो हि झायन्तो पप्पोति विपुलं सुखं ॥७॥

प्रमाद कार्यरत असु नका, काम-रति च्या संसर्गात राहु नका,
अप्रमादी ध्यानमग्न विपुल सुख मिळवीतो. (७)

पमादं अप्पमादेन यदा नुदति पण्डितो ।
पञ्ञापासादमारुय्ह असोको सोकिनिं पजं ।
पब्बतट्ठ व भुम्मट्ठो धीरो बाले अवेक्खति ॥८॥

जेंव्हा ज्ञानी (मानव) प्रमादाला अप्रमादाने दूर घालवितो, (तेव्हां तो)
प्रज्ञा-महालावर आरुढ शोकरहित (मानव) शोकग्रस्ताला (असे पहातो, जसे)
पर्वतावर उभा धीर (माणूस) जमीनीवरच्या अज्ञानी (माणसा)ला पहातो. (८)

अप्पमत्तो पमत्तेसु सुत्तेसु बहुजागरो ।
अबलस्सं' व सीघस्सो हित्वा याति सुमेधसो ॥९॥

अप्रमादी प्रमाद्याच्या, सदाजागृत झोपलेल्याच्या, (असा पुढे जातो, जसा)
वेगवान (घोडा) अशक्ताच्या पुढे जातो. (९)

अप्पमादेन मघवा देवानं सेट्ठतं गतो ।
अप्पमादं पसंसन्ति पमादो गरहितो सदा ॥१०॥

अप्रमादाने इन्द्र देवतांमध्ये श्रेष्ठ झाला, (म्हणुनच)
अप्रमाद्याची प्रशंसा होते, प्रमाद्याची निंदा होते. (१०)

अप्पमादरतो भिक्खु पमादे भयदस्सि वा ।
सञ्ञोजनं अणुं थूलं डहं अग्गीव गच्छति ॥११॥

प्रमादास घाबरणारा, अप्रमादी भिक्षु
लहान-मोठ्या बंधनांना अग्नीसारखे जाळतो. (११)

अप्पमादरतो भिक्खु पमादे भयदस्सि वा ।
अभब्बो परिहाणाय निब्बणस्सेव सन्तिके ॥१२॥

प्रमादास घाबरणाऱ्या, अप्रमादी भिक्षुची
हानी होणे अशक्य. (तो) निर्वाणाच्या जवळ आहे. (१२)

**फन्दनं चपलं चित्तं दुरक्खं दुन्निवारयं।**
**उजुं करोति मेधावी उसुकारो व तेजनं ॥१॥**

स्पंदनकारी, चपळ चित्त रक्षण (करण्यास) कठीण, स्थिर (करण्यास) कठिण,
प्रज्ञावान ते सरळ करतो, जसे बाण-कार (बाण) करतो. (१)

**वारिजो' व थले खित्तो ओकमोकत उब्भतो।**
**परिफन्दति'दं चित्तं मारधेय्यं पहातवे ॥2॥**

पाण्यातून जमीनीवर फेकलेला मासा जसा तडफडतो,
भुलैयात अडकलेले चित्त (मुक्त होण्यास) तडफडते. (२)

**दुन्निग्गहस्स लहुनो यत्थ कामनिपातिनो।**
**चित्तस्स दमथो साधु चित्तं दन्त सुखावहं ॥3॥**

निग्रह-कठिण, गतीमान, तसेच स्वैराचारी
चित्ताचे दमन (चित्त संयमित) करणे चांगले, संयमित चित्त सुखावह. (३)

**सुदुद्दसं सुनिपुणं यत्थकामनिपातिनं।**
**चित्तं रक्खेय्य मेधावी, चित्तं गुत्तं सुखावहं ॥४॥**

अदृश्य, अति-तरबेज, तसेच स्वैराचारी अशा
चित्ताचे, प्रज्ञावान (मानव) रक्षण करतो, संरक्षित चित्त सुखावह. (४)

**दुरङ्गमं एकचरं असरीरं गुहासयं।**
**ये चित्त सञ्ञमेस्सन्ति मोक्खन्ति मारबन्धना ॥५॥**

दुरगामी, एकटे रहाणारे, निराकार, गुढ-आशयी,
अशा चित्ताला जे संयमीत ठेवतात, तेच भुलैया बंधनातून मुक्त होतात. (५)

**अनवट्ठितचित्तस्स सद्धम्मं अविजानतो।**
**परिप्लवपसादस्स पञ्ञा न परिपुरति ॥६॥**

अस्थिर चित्त (मानव) सुसिद्धान्त न जाणणारा,
चंचल (मानव) प्रज्ञावान होत नाही. (६)

**अनवस्सुतचित्तस्स अनन्वाहतेचेतसो ।**
**पुञ्ञपापपहीणस्स नत्थि जागरतो भयं ॥७॥**

स्थिर चित्त, मलरहीत चित्त (असणाऱ्या),
पाप-पुण्य विहीन, जागृत, (मानवास) कशाचेही भय नसते. (७)

**कुम्भूपमं कायमिमं विदित्वा नगरुपमं चित्तमिदं ठेपत्वा ।**
**योधेथ मारं पञ्ञायुधेन जितं च रक्खे अनिवेसनो सिया ॥८॥**

शरीर (मातीच्या) घड्या सारखे जाणावे, तर चित्त शहरा सारखे (विशाल) असावे,
प्रज्ञा-हत्याराने भुलैयाशी युद्ध जिंकल्यावरही चित्त रक्षावे, अनासक्त ठेवावे.(८)

**अचिरं वत'यं कायो पठविं अधिसेस्सति ।**
**छुद्धो अपेतविञ्ञाणो निरत्थं' व कलिङ्गरं ॥९॥**

नश्वर असे हे शरीर जमिनीवर पडेल,
तुच्छ, चेतनाशून्य आणि निरर्थक ओंडक्यासारखे. (९)

**दिसो दिसं यन्तं कयिरा वेरी वा पन वेरिनं ।**
**मिच्छापणिहितं चित्तं पापियो'नं ततो करे ॥१०॥**

शत्रु शत्रुचा वा वैरी वैऱ्याचा (जितका करणार नाही),
वाइट संकल्पनायुक्त चित्त तितका दुष्प्रभाव (निर्माण) करते. (१०)

**न तं माता पिता कयिरा अञ्ञे वापि च ञातका ।**
**सम्मापणिहितं चित्तं सेय्यसो'नं ततो करे ॥११॥**

माता-पिता वा इतर नातेवाईक (जितका करणार नाही),
सुसंकल्पनायुक्त चित्त तितका श्रेष्ठभाव (निर्माण) करते. (११)

**को इमं पठविं विजेस्सति यमलोकञ्च इमं सदेवकं।**
**को धम्मपदं सुदेसितं कुसलो पुप्फमिव पचेस्सति ॥१॥**

यमलोक आणि पृथ्वीला देवलोकांसह कोण जिंकेल ?
कोण चतुर या सिद्धांतांना (धम्मपदांना) फुलांसारखे सुंदर तयार करील ? (१)

**सेखो पठविं विजेस्सति यमलोकञ्च इमं सदेवकं।**
**सेखो धम्मपदं सुदेसितं कुसलो पुप्फमिव पचेस्सति ॥2॥**

(प्रज्ञेचा) शिष्य यमलोक आणि पृथ्वीला देवलोकांसह जिंकेल,
(प्रज्ञेचा) चतुर शिष्य या सिद्धांतांना फुलांसारखे सुंदर तयार करील ? (२)

**फेणूपमं कायमिमं विदित्वा मरीचिधम्मं अभिसम्बुधानो।**
**छेत्वान मारस्स पपुप्फकानि अदस्सनं मच्चुराजस्स गच्छे॥3॥**

शरीर हे फेसा सारखे , मृगजळा सारखे समजून, पूर्ण ज्ञानी व्हावे,
भुलैयाला फुलासारखे तोडून, मृत्यूस अदृश्य व्हावे. (३)

**पुप्फानि हेव पचिनन्तं ब्यासत्तमनसं नरं।**
**सुत्तं गामं महोघो'व मच्चु आदाय गच्छति ॥४॥**

फुले वेचण्यात मनस्वी मग्न मानवास,
झोपलेल्या गावाला नदी-पूराने (वाहुन न्यावे), मृत्यू तसे घेवून जाते. (४)

**पुप्फानि हेव पचिनन्तं ब्यासत्तमनसं नरं।**
**अतित्तं येव कामेसु अन्तको कुरुते वसं ॥५॥**

फुले वेचण्यात मनस्वी मग्न मानवास,
वासनांच्या अतृप्तीतच अन्त (मृत्यू) वश करतो. (५)

**यथापि भमरो पुप्फं वण्णगन्धं अहेठयं।**
**पलेति रसमादाय एवं गामे मुनी चरे ॥६॥**

जसे भ्रमर फुलाच्या रंग-गंधाला त्रास न देता,
रस घेवुन जातो, तसे मुनीने (सुजनाने) गावात वावरावे. (६)

**न परेसं विलोमानि न परेसं कताकतं।**
**अत्तनो'व अवक्खेय्य कतानि अकतानि च ॥७॥**

दुसऱ्यांच्या विरोधात, दुसऱ्यांचे कृत्य-अकृत्य न पहाता
(फक्त) स्वता:चे कृत्य-अकृत्य पहावे. (७)

**यथापि रुचिरं पुप्फं वण्णवन्तं अगन्धकं।**
**एवं सुभासिता वाचा अफला होति अकुब्बतो ॥८॥**

जसे सुंदर रंगीत फुल सुगन्धा विना (व्यर्थ) असते,
तसे कृती विना गोड बोलणे व्यर्थ होते. (८)

**यथापि रुचिरं पुप्फं वण्णवन्तं सगन्धकं।**
**एवं सुभासिता वाचा अफला होति सकुब्बतो ॥९॥**

जसे सुंदर, रंगीत फुल सुगन्धामुळे (सार्थ) होते,
तसे सत्कृत्यामुळे गोड बोलणे सार्थ होते. (९)

**यथापि पुप्फरासिम्हा कयिरा मालागुणे बहु।**
**एवं जातेन मच्चेन कत्तब्बं कुसलं बहु ॥१०॥**

जसे फुलांच्या राशीं मधून अनेक माळा करतात,
तसे जन्मलेल्या मर्त्याने (मानवाने) अनेक सत्कृत्य करावी. (१०)

**न पुप्फगन्धो पटिवातमेति न चन्दनं तगरमल्लिका वा।**
**सतञ्च गन्धो पटिवातमेति सब्बा दिसा सप्पुरिसो पवाति ॥११॥**

चन्दन, तगर-चमेली (आदी) फुलांचा गन्ध वारा-विरोधी (दिशेने वहात) नसतो,
सुजनांचा गंध वारा-विरोधी (दिशेने वहातो), सर्व दिशांना पसरतो. (११)

**चन्दनं तगरं वापि उप्पलं अथ वस्सिकी।**
**एतेसं गन्धजातानं सीलगन्धो अनुत्तरो ॥12॥**

चन्दन, तगर-चमेली अथवा कमळाच्या गन्धाहून,
सुशीलाचा (चांगल्या शीलाचा) सुगंध श्रेष्ठ आहे. (१२)

**अप्पमत्तो अयं गन्धो या'यं तरगचन्दनी ।**
**यो च सीलवतं गन्धो याति देवेसु उत्तमो ॥१३॥**

तगर-चन्दनाचा हा गन्ध अत्यल्प आहे,
(परंतु) हा शीलवान माणसाचा गन्ध महाजनांपर्यंत (देवांपर्यंत) जातो. (१३)

**तेसं सम्पन्नसीलानं अप्पमादविहारिन ।**
**सम्मदञ्ञाविमुत्तानं मारो मग्गं न विन्दति ॥१४॥**

त्या शील-सपन्न, अप्रमादात रहाणाऱ्या,
योग्य ज्ञानामुळे मुक्त (मानवाचा) मार्ग भुलैया अडवित नाही. (१४)

**तथा सङ्कारधानस्मिं उज्झितस्मिं महापथे ।**
**पदुमं तत्थ जायेथ सुचिगन्धं मनोरमं ॥१५॥**

जसे महामार्गावर टाकलेल्या कचऱ्यातून,
मनोहर - सुगन्धि कमळ उगवते .... (१५)

**एवं सङ्कारभूतेसु अन्धभूते पुथुज्जने ।**
**अतिरोचति पञ्ञाय सम्मासम्बुद्धसावको ॥१६॥**

तसेच कचऱ्यासमान, (अज्ञानाने) अंधळ्यासमान सामान्य जनांत,
सम्यक-सम्बुद्धाचे शिष्य प्रज्ञेने खुप चमकतात. (१६)

**दीघा जागरतो रत्ति दीघं सन्तस्स योजनं ।**
**दीघो बालानं संसारो सद्धम्मं अविजानातं ॥१॥**

जागणाऱ्याची रात्र लांबत जाते, थकलेल्याचा मैल (रस्ता) लांबत जातो,
सदाचार न जाणणाऱ्या अज्ञानीचा संसार (जीवन प्रवाह) लांबत जातो. (१)

**चरञ्चे नाधिगच्छेय्य सेय्यं सदिसमत्तनो ।**
**एकचरियं दळ्हं कयिरा नत्थि बाले सहायता ॥2॥**

चालताना स्वतःसारखा किंवा स्वतःहून श्रेष्ठ (सोबती) न लाभल्यास,
खंबीर पणे एकाकी चालावे, अज्ञानीची सोबत करु नये. (२)

**पुत्ताम'त्थि धनमत्थि इति बालो विहञ्ञति ।**
**अत्ताहि अत्तनो नत्थि कुतो पुत्ता कुतो धनं ॥3॥**

माझा पुत्र, माझी संपत्ति, असे अज्ञानी दुःखी होतात,
स्वतःच स्वतःचे नसतो, (तर) कसा पुत्र, कशी संपत्ति. (३)

**यो बालो मञ्ञति बाल्यं पण्डितो वापि तेन सो ।**
**बालो च पण्डितमानी, स वे बालो'ति वुच्चति ॥४॥**

अज्ञानी स्वतःला अज्ञानी समजत असेल तर तो तितका ज्ञानी आहे,
अज्ञानी असुनही स्वतःला बुद्धिमान सांगतो तो (खरा) अज्ञानी. (४)

**याव जीवम्पि चे बालो पण्डितं पयिरुपासति ।**
**न सो धम्मं विजानाति दब्बी सूपरसं यथा ॥५॥**

अज्ञानी (मानव) जीवनभर बुद्धिमंताच्या सोबत राहिला तरी...
त्याला सुसिद्धांत (धम्म) समजत नाही, जसे पळीला वरणाचा स्वाद. (५)

**मुहुत्तमपि चे विञ्ञू पण्डितं पयिरुपासति ।**
**खिप्पं धम्मं विजानाति जिव्हा सूपरसं यथा ॥६॥**

सुजाण माणूस क्षणभरही बुद्धिमंताच्या सोबत राहिला तरी...
त्याला सुसिद्धांत (धम्म) समजतो, जसे जिभेला वरणाचा स्वाद. (६)

**चरन्ति बाला दुम्मेधा अमित्तेनेव अत्तना।**
**करोन्ता पापकं कम्मं यं होति कटुकप्फलं ॥७॥**

अज्ञानी, दुर्बुद्ध स्वताच स्वताचा शत्रु होतो,
दुष्कृत्य करुन, ज्याची फळे कडु असतात. (७)

**न तं कम्मं कतं साधु यं कत्वा अनुतप्पति।**
**यस्स अस्सुनुखो रोदं विपाकं पटिसेवति ॥८॥**

ते कृत्य करणे चांगले नाही, ज्याने पश्चाताप करावा लागतो,
आणि ज्याचे परिणाम अश्रु(पूर्ण) चेहेऱ्याने रडत भोगावे लागतात. (८)

**तञ्च कम्मं कतं साधु यं कत्वा नानुतप्पति।**
**यस्स पतीतो सुमनो विपाकं पटिसेवति ॥९॥**

ते कृत्य करणे चांगले, ज्याने पश्चाताप करावा लागत नाही,
आणि ज्याचे परिणाम प्रसन्न चित्ताने, चांगल्या मनाने भोगता येतात. (९)

**मधुवा मञ्ञति बालो याव पापं न पच्चति।**
**यदा च पच्चति पापं अथ बालो दुक्खं निगच्छति ॥१०॥**

जोवर दुष्कृत्य पक्व होत नाही तोवर अज्ञानी त्याला गोड समजतात,
जेंव्हा दुष्कृत्य परिपक्व (परिणामित) होते, तेंव्हा ते दुक्खी होतात. (१०)

**मासे मासे कुसग्गेन बालो भुञ्जेथ भोजनं।**
**न सो संखतधम्मानं कलं अग्घति सोळसिं ॥११॥**

अज्ञानी (माणसाने) महिनो-महिने गवताच्या टोकाने अन्न खाल्ले,
तरी तो सुसिद्धांत जाणणाऱ्याच्या सोळाव्या भागाच्या सममुल्य होत नाही. (११)

**न हि पापं कतं कम्मं सज्जु खीरंव मुच्चति।**
**डहन्तं बालमन्वेति भस्मच्छन्नोव पावको ॥१२॥**

वाइट केलेली कृत्य (ताज्या) दुधासारखी त्वरीत नासत (परिणामित होत) नाहीत,
ती राखेने अच्छादित निखाऱ्यांसारखी,अज्ञानी(मानवा)चा पाठलाग करतात.(१२)

**यावदेव अनत्थाय ञतं बालस्स जायति।**
**हन्ति बालस्स सुक्कंसं मुद्धमस्स विपातयं ॥१३॥**

अज्ञानीच्या जाणिवांचा आभाळापर्यंत अनर्थ होतो,
अज्ञानीच्या शुभकृत्यांचा नाश होतो, शिराचा (बुद्धिचा) नाश होतो. (१३)

**असन्तं भावनमिच्छेय्य पुरेक्खारञ्च भिक्खुसु।**
**अवासेसु च इस्सरायं पूजा परकुलेसु च ॥१४॥**

भिक्खुं मध्ये आदर प्राप्ती ची इच्छा, (हे) दुष्टतेचे, चुकीचे आहे.
मठ-मंदिराचा उपभोग, परक्या कुळाच्या (लोकां) कडून पुजिले जाणे... (१४)

**ममेव कतमञ्ञन्तु गिही पब्बजिता उभो।**
**ममेवातिवसा अस्सु किच्चाकिच्चेसु किस्मिच।**
**इति बालस्स सङ्कप्पो इच्छा मानो च वड्ढति ॥१५॥**

गृहस्थ व प्रवज्जित या दोहोत माझ्यासारखा कोण ?
योग्य-अयोग्य कार्यांवर माझेच स्वमित्व असावे,
अशी संकल्पना करणाऱ्या अज्ञानीच्या आकांक्षा, गर्व वाढतो. (१५)

**अञ्ञा हि लाभुपनिसा अञ्ञा निब्बान गामिनी।**
**एवमेत्तं अभिञ्ञाय भिक्खु बुद्धस्स सावको।**
**सक्कारं नाभिनन्देय्य विवेकमनुब्रूहये ॥१६॥**

लाभाचा मार्ग वेगळा, निर्वाणाचा मार्ग वेगळा,
हे असे जाणून बुद्धाच्या शिष्य भिक्खुने,
सत्काराने आनंदु नये, विवेकाची वृद्धी करावी. (१६)

**निधीनं'व पवत्तारं यं पस्से वज्ज दस्सिनं ।**
**निग्गय्हवादिं मेधाविं तादिसं पण्डितं भजे ।**
**तादिसं भजमानस्स सेय्यो होति न पापियो ॥१॥**

जो दोषाची बाजु दाखविणाऱ्याला संपत्तिच्या अस्तित्वासम समजतो,
(मनो)निग्रही, प्रज्ञावान, बुद्धिवाना सारख्यांची संगत करतो,
तशा चित्ताच्या संगाने श्रेष्ठ (भले) होते, वाईट होत नाही. (१)

**ओवदेय्यानुसासेय्य असब्भा च निवारये ।**
**सतं हि सो पियो होति असतं होति अप्पियो ॥2॥**

जो उपदेश करतो, अनुशासन करतो, अनुचिताचे निवारण करतो,
ते सुजनांना प्रिय असतात, दुर्जनांना अप्रिय असतात. (२)

**न भजे पापके मित्ते न भजे पुरिसाधमे ।**
**भजेथ मित्ते कल्याणे भजेथ पुरसुत्तमे ॥3॥**

दुराचारी मित्राची संगत नको, अधम माणसाची संगत नको,
कल्याणकारी मित्राची संगत करावी, उत्तम माणसाची संगत करावी. (३)

**धम्मपीति सुखं सेति विपस्सनेन चेतसा ।**
**अरियप्पवेदिते धम्मे सदा रमति पण्डितो ॥४॥**

सदाचारावर श्रद्धा (प्रीती) असणारा सुखाने, निश्चिंत मनाने झोपतो,
बुद्धिमान (आर्यांनी) सुजनानी सांगीतलेल्या सिद्धांतात रममाण असतात. (४)

**उदकं हि नयन्ति नेत्तिका उसुकारा नमयन्ति तेजनं ।**
**दारुं नमयन्ति तच्छका अत्तानं दमयन्ति पण्डिता ॥5॥**

(पाणी) नेणारा पाणी नेतो, बाणकार बाण बनवितो,
सुतार लाकुड बनवितो, बुद्धिमान स्वतःला कष्टवितात. (५)

**सेलो तथा एकघनो वातेनं न समीरति।**
**एवं निन्दापसंसासु न समिञ्जन्ति पण्डिता ॥६॥**

जसे मोठा पर्वत वाऱ्याने हलत नाही,
तसेच बुद्धिमंत निंदा वा प्रशंसेने विचलीत होत नाही. (६)

**यथापि रहदो गम्भीरो विप्पसन्नो अनाविलो।**
**एवं धम्मानि सुत्वान विप्पसीदन्ति पण्डिता ॥७॥**

जसे अथांग, स्थिर तलाव नितळ-स्वच्छ असतात,
तसे बुद्धिमंत 'सदाचार सिद्धांत' (धम्म) ऐकुन नितळ (स्पष्ट) होतात. (७)

**सब्बत्थ वे सप्पुरिसा चजन्ति न कामकामा लपयन्ति सन्तो।**
**सुखेन पुट्ठा अथवा दुखेन न उच्चावचं पण्डिता दस्सयन्ति ॥८॥**

सत्पुरुष सर्वस्व त्यागतात, सुजन इच्छा-भोगा संबंधी बोलतही नाहीत,
सुखाने वा दुक्खाने विचारले (ग्रासले)(तरी) बुद्धिमंत उच्च-नीचता पहात
(विकृत होत) नाहीत. (८)

**न अत्त हेतु न परस्स हेतु न पुत्तमिच्छे न धनं न रट्ठं।**
**न इच्छेन अधम्मेन समिद्धिमत्तनो**
**स सीलवा पञ्ञ वा धम्मिको सिया ॥९॥**

न स्वत:साठी, न दुसऱ्यासाठी, न पुत्राच्या इच्छेने, न राज्या साठी,
स्वत:च्या समृद्धीसाठी, दुराचाराची (अद्धमाची) इच्छा करतो,
तो शीलवान, प्रज्ञावान, सदाचारी (धम्मिक) असतो. (९)

**अप्पका ते मनुस्सेसु ये जना पारगामिनो।**
**अथायं इतरा पजा तीरमेनुधावति ॥१०॥**

जे लोक पार जातात ते मानवात कमीच,
तेंव्हा इतर प्रजा (लोक) किनाऱ्यावरच धावत असतात. (१०)

**कण्हं धम्मं विप्पहाय सुक्कं भावेथ पण्डितो।**
**ओका अनोकं आगम्म विवेके यत्थं दूरमं ॥१२॥**

काळा (वाइट) स्वभाव सोडुन बुद्धिमानांनी शुभ-सवय करावी,
घरातुन बेघर (होउन), विचाराने दुर जाऊन (एकाकी व्हावे)....(१२)

**तत्राभिरतिमिच्छेय्य हित्वा कामे अकिञ्चनो।**
**परियोदपेय्य अत्तानं चित्तक्लेसेहि पण्डितो ॥१३॥**

वासनांचा त्याग करुन, तेथेच रहाण्याची इच्छा करावी,
स्वत:च्या चित्तातले क्लेष स्वच्छ करावे. (१३)

**येसं सम्बोधि अङ्गेसु सम्मा चित्तं सुभावितं।**
**आदान पटिनिस्सग्गे अनुपादाय ये रता।**
**खीणासवा जुतीमन्तो ते लोके परिनिब्बुता ॥१४॥**

ज्यांचे चित्त सर्वांगाने सुबुद्ध, योग्य असते,
विचार न करता (निश्चयाने) ग्रहणाच्या परित्यागात रममाण असतात,
वाइट-विचार-क्षीण, प्रभावंत (मानव) (या) लोकात निर्वाण प्राप्त करतात. (१४)

गतद्धिनो विसोकस्स विप्पमुत्तस्स सब्बधि ।
सब्बगन्थप्पहीणस्स परिळाहो न विज्जति ॥१॥

मार्ग समाप्त केलेला (अन्ताला पोचलेला), शोक-रहीत, सर्वथा मुक्त,
सर्व-बंधन-क्षीण (मानवास) परिताप होत नाही. (१)

उय्युञ्जान्ति सतीमन्तो न निकेते रमन्ति ते ।
हंसा'व पल्ललं हित्वा ओकमोकं जहन्ति ते ॥2॥

विचारवन्त-उद्योग करतात, घरात (सामान्य गोष्टीत) रमत नाहीत,
जसा हंस लहान तलाव सोडुन जातो, तसेच घरातले 'घर' सोडुन जातात. (२)

येसं सन्निचयो नत्थि ये परियातभोजना ।
सुञ्ञतो अनिमित्तो च विमोक्खो यस्स गोचरो ।
आकासे'व सकुन्तानं गति तेसं दुरन्नया ॥3॥

जे संचय करीत नाहीत, जे भोजनाची योग्य मात्रा जाणतात,
शुन्य-स्वरुप, निमित्त-रहीत विमुक्ती ज्याच्या दृष्टीपथात आहे,
त्यांची गती, आकाशात पक्षांची असते तशी, अज्ञेय असते. (३)

यस्सा'सवा परिक्खीणा आहारे च अनिस्सितो ।
सुञ्ञतो अनिमित्तो च विमोक्खो यस्स गोचरो ।
आकासे'व सकुन्तानं पदं तस्स दुरन्नयं ॥४॥

ज्याचे वाइट विचार क्षीण आहेत, आहारात आसक्त नाही,
शुन्य-स्वरुप, निमित्त-रहीत विमुक्ती ज्याच्या दृष्टीपथात आहे,
त्यांचे स्थान, आकाशात पक्षांचे असते तसे, अज्ञेय असते. (४)

यस्सिन्द्रियाणि समथं गतानि, अस्सा यथा सारथिना सुदन्ता ।
पहीनमानस्स अनासवस्स, देवापि तस्स पिहयन्ति तादिनो ॥५॥

ज्याचे इंद्रिय शांत आहेत, जसा सारथ्याने सुशिक्षित (केलेला) घोडा,
अहंकार त्यागलेले, दुर्विचारविहीन (मानव), महाजनांनाही प्रिय होतात. (५)

**पठवीसमो नो विरुज्झति इन्दखीलुपमो तादि सुब्बतो ।
रहदो'व अपेतकद्दमो संसारा न भवन्ति तादिनो ॥६॥**

जो सदाचारात पृथ्वीसारखा, नगर-द्वार-स्तंभा सम निश्चल असतो,
त्याच्यात जगरहाटीचे अस्तित्व रहात नाही, जसे शेवाळ दूर केलेला तलाव. (६)

**सन्तं तस्स मनं होति सन्ता वाचा च कम्म च ।
सम्मदञ्ञा विमुत्तस्स उपसन्तस्स तादिनो ॥७॥**

शीणलेले मन, वाचा, कृती शांत होतात ....
सुजाणतेमुळे विमुक्त होऊन, तसे चित्त शांत होते. (७)

**अस्सद्धो अकतञ्ञू च सन्धिच्छेदो च यो नरो ।
हतावकासो वन्तासो स वे उत्तमपोरिसो ॥८॥**

अश्रद्धा, अकृतज्ञता यांच्याशी संबंध छेदणारा मानव,
शुभ-अशुभाच्या मर्यादा त्यागलेला, तो उत्तम मानव. (८)

**गामे वा यदि वा रञ्ञे निन्ने वा यदि वा थले ।
यत्थारहन्तो विहरन्ति तं भूमिं रमणेय्यकं ॥९॥**

गाव किंवा रान (जंगल), तळ (खोल जमीन) किंवा पठार (सपाट जमीन),
जेथे अर्हत* रहातात, ती भुमि रमणीय (आनंददायी). (९)

**रमणीयानि अरञ्ञानि यत्थ न रमते जनो ।
वीतरागा रमिस्सन्ति न ते कामगवेसिनो ॥१०॥**

जेथे (सामान्य) लोक रममाण होत नाहीत, तथे अरण्यात सुजन रमतात,
तेथे वैरागी रमतात, कारण ते भोगाचा शोध घेत नाहीत. (१०)

* अर्हत - अर्हता प्राप्त केलेले, विशिष्ट श्रेणी प्राप्त केलेले.

**सहस्समपि चे वाचा अनत्थपदसंहिता।**
**एकं अत्थपदं सेय्यो यं सुत्वा उपसम्मति ॥१॥**

हजारी निरर्थक पदांची गाथा बोलण्या (वाचण्या) पेक्षा ....
एक अर्थपूर्ण पद श्रेष्ठ, जे ऐकून शांती मिळते. (१)

**सहस्समपि चे गाथा अनत्थपदसंहिता।**
**एकं गाथापदं सेय्यो यं सुत्वा उपसम्मति ॥2॥**

हजारी गाथा, निरर्थक पदांनी बनलेल्या, पेक्षा ....
एक अर्थपूर्ण गाथा श्रेष्ठ, जी ऐकून शांती मिळते. (२)

**यो च गाथा सतं भासे अनत्थपदसंहिता।**
**एकं धम्मपदं सेय्यो यं सुत्वा उपसम्मति ॥3॥**

शंभर निरर्थक पदांनी बनलेल्या गाथा सांगण्या पेक्षा ....
एक सदाचार-पद श्रेष्ठ, जे ऐकून शांती मिळते. (३)

**यो सहस्सं सहस्सेन सङ्गामे मानुसे जिने ।**
**एकं च जेय्यमत्तानं स वे सङ्गामजुत्तमो ॥४॥**

जो युद्धात लाखो लोकांना जिंकतो (त्या जेत्याहुन),
जो एक स्वत:ला जिंकतो, तो उत्तम युद्धजेता होय. (४)

**अत्ता हवे जितं सेय्यो या चायं इतरा पजा।**
**अत्तदन्तस्स पोसस्स निच्चं सञ्ञतचारिनो ॥५॥**

इतर (प्रजा)जनां पेक्षा स्वत:चा निश्चयाने विजय श्रेष्ठ,
(स्व)स्वत:च्या ताब्यात ठेवणे, नित्य संयमित आचारांचे पोषण (असा विजय),(५)

**नेव देवो न गंधब्बो न मारो सह ब्रह्मुना।**
**जितं अपजितं कयिरा तथारूपस्स जन्तुनो ॥६॥**

ना महाजन, ना गंधर्व, ना भुलैया सह ब्रम्हा,
(ना) अशा प्रकारचा (कोणीही) जीव, या विजयाचा पराजय करील. (६)

**मासे मासे सहस्सेन यो यजेथ सतं समं ।**
**एकञ्च भावितत्तानं मुहुत्तमपि पुजये ।**
**सा येव पुजना सेय्यो यं चे वस्ससतं हुतं ॥७॥**

महिनों-महिने हजार यज्ञ, शंभर वर्षां पर्यन्त पुन्हा-पुन्हा,
(आणि) एकच विषेश-ज्ञानी चा (प्रज्ञावानाचा) क्षणभराचा सत्कार (पूजा)
हे पुजन श्रेष्ठ होते, शतवर्ष केलेल्या (वरील यज्ञा) पेक्षा. (७)

**यो च वस्ससतं जन्तु अग्गिं परिचरे वने ।**
**एकञ्च भावितत्तानं मुहुत्तमपि पुजये ।**
**सा येव पुजना सेय्यो यं चे वस्ससतं हुतं ॥८॥**

शतवर्ष, वनात विहरणाऱ्या जीवांना अग्नीत (आहुती),
(आणि) एकच विषेश-ज्ञानी चा (प्रज्ञावानाचा) क्षणभराचा सत्कार (पूजा)
हे पुजन श्रेष्ठ होते, शतवर्ष केलेल्या (वरील यज्ञा) पेक्षा. (८)

**यं किंचि यिट्ठं च हुतं च लोके, संवच्छरं यजेथ पुञ्ञपेक्खो ।**
**सब्बम्पि तं न चतुभागमेति, अभिवादना उजुगतेसु सेय्यो ॥९॥**

या लोकात पुण्याच्या अपेक्षेने वर्षभर यज्ञ (करणे), कांही आहुति (देणे),
हे सर्व उज्वल-श्रेष्ठाला अभिवादन करण्याच्या चौथ्या भागा इतकेही नाही. (१०)

**अभिवादनसीलिस्स निच्चं वुद्धापचायिनो ।**
**चत्तारो धम्मा वड्ढन्ति आयु वण्णो सुखं बलं ॥१०॥**

अभिवादनशील, नित्य ज्येष्ठांची सेवा करणारे (यांचे),
आयुष्य, वर्ण(सौंदर्य), सुख, बळ हे चारही स्वभाव वाढतात. (१०)

**यो च वस्ससतं जीवे दुस्सीलो असमाहितो ।**
**एकाहं जीवितं सेय्यो सीलवन्तस्स झायिनो ॥११॥**

शीलहीन, एकाग्रचित्तहीन (मानवाच्या) शंभर वर्ष आयुष्याहून,
शीलवान-ध्यानी (मानवाचा) एक दिवस श्रेष्ठ असतो. (११)

**यो च वस्ससतं जीवे दुप्पञ्ञो असमाहितो।**
**एकाहं जीवितं सेय्यो पञ्ञावन्तस्स झायिनो ॥१२॥**

प्रज्ञाहीन, एकाग्रचित्तहीन (मानवाच्या) शंभर वर्ष आयुष्याहून,
प्रज्ञावान-ध्यानी (मानवाचा) एक दिवस श्रेष्ठ असतो. (१२)

**यो च वस्ससतं जीवे कुसीतो हीनवीरियो।**
**एकाहं जीवितं सेय्यो विरियमारभतो दळ्हं ॥१३॥**

आळशी, शौर्यहीन (मानवाच्या) शंभर वर्ष आयुष्याहून,
दृढ-उद्योगी, शूर (मानवाचा) एक दिवस श्रेष्ठ असतो. (१३)

**यो च वस्ससतं जीवे अपस्सं उदयव्ययं।**
**एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो उदयव्ययं ॥१४॥**

उत्पत्ति-विनाश न पहाणाऱ्या (मानवाच्या) शंभर वर्ष आयुष्याहून,
उत्पत्ति-विनाश पहाणाऱ्या (मानवाचा) एक दिवस श्रेष्ठ असतो. (१४)

**यो च वस्ससतं जीवे अपस्सं अमतं पदं।**
**एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो अमतं पदं ॥१५॥**

अमृतपद (निर्वाण) न पहाणाऱ्या (मानवाच्या) शंभर वर्ष आयुष्याहून,
अमृतपद पहाणाऱ्या (मानवाचा) एक दिवस श्रेष्ठ असतो. (१५)

**यो च वस्ससतं जीवे अपस्सं धम्ममुत्तमं।**
**एकाहं जीवितं सेय्यो पस्सतो धम्ममुत्तमं ॥१६॥**

उत्तम जीवन सिद्धांत न पहाणाऱ्या (मानवाच्या) शंभर वर्ष आयुष्याहून,
उत्तम जीवन सिद्धांत पहाणाऱ्या (मानवाचा) एक दिवस श्रेष्ठ असतो. (१६)

**अभित्थरेथ कल्याणे पापा चित्तं निवारये ।
दन्धं हि करोति पुञ्ञं पापस्मिं रमते मनो ॥१॥**

सत्कार्य त्वरेने करावे, चित्त दुष्कृत्या पासून दूर करावे,
सत्कार्य करण्यात शिथीलता आल्यास मन दुष्कृत्यात रमते. (१)

**पापञ्चे पुरिसो कयिरा न तं कयिरा पुनप्पुनं ।
न तम्हि छन्दं कयिराथ दुक्खो पापस्स उच्चयो ॥2॥**

मनुष्याने (एकदा) दुष्कृत्य केले, तर ते पुन्हा-पुन्हा करु नये,
तशी इच्छा करु नये, दुष्कृत्याच्या संग्रहाने दुक्ख वाढते. (२)

**पुञ्ञञ्चे पुरिसो कयिरा कयिराथेन पुनप्पुनं ।
तम्हि छन्दं कयिराथ सुखो पुञ्ञस्स उच्चयो ॥3॥**

मनुष्याने (एकदा) सत्कृत्य केले, तर ते पुन्हा-पुन्हा करावे,
तशी इच्छा करावी, सत्कृत्याच्या संग्रहाने सुख वाढते. (३)

**पापोपि पस्सति भद्रं याव भद्रं न पच्चति ।
यदा च पच्चति पापं अथ पापो पापानि पस्सति ॥४॥**

दुष्कृत्य करणाऱ्याला भले वाटते, जोवर दुष्कृत्य पक्व (फलदायी) होत नाही,
जेंव्हा दुष्कृत्य पक्व (फलदायी) होते, तेव्हां त्याला ते वाइट वाटते. (४)

**भद्रोपि पस्सति पापं याव भद्रं न पच्चति ।
यदा च पच्चति भद्रं अथ भद्रो भद्राणि पस्सति ॥५॥**

सत्कृत्य करणाऱ्याला वाइट वाटते, जोवर सत्कृत्य पक्व (फलदायी) होत नाही,
जेंव्हा सत्कृत्य पक्व (फलदायी) होते, तेव्हां त्याला ते चांगले वाटते. (५)

मावमञ्ञेथ पापस्स न मन्तं आगमिस्सति ।
उदबिन्दुनिपातेन उदकुम्भोपि पुरति ।
पूरति बालो पापस्स थोक-थोकम्पि आचिनं ॥६॥

माझ्या जवळ दुष्कृत्य येणार नाही असा गर्व करु नये,
पाण्याच्या थेंबांनीच पाण्याचा घडा भरतो,
अज्ञानी थोडे-थोडे दुष्कृत्य (करुन) पूर्ण साठवतो. (६)

मावमञ्ञेथ पुञ्ञस्स न मन्तं आगमिस्सति ।
उदबिन्दुनिपातेन उदकुम्भोपि पुरति ।
पूरति धीरो पुञ्ञस्स थोक-थोकम्पि आचिनं ॥७॥

माझ्या जवळ सत्कृत्य येणार नाही असा गर्व करु नये,
पाण्याच्या थेंबांनीच पाण्याचा घडा भरतो,
बुद्धिवान थोडे-थोडे सत्कृत्य (करुन) पूर्ण साठवतो. (७)

वाणिजो' व भयं मग्गं अप्पसत्थो महद्धनो ।
विसं जीवितुकामो'व पापानि परिवज्जये ॥८॥

व्यपारी, खुप धनवान, भयावह मार्गाची अप्रशंसा करतात,
जगण्याची इच्छा असणारे विषाची, तशी (मानवाने) दुष्कृत्याची करावी. (८)

पाणिम्हि चे वणो नास्स हरेय्य पाणिना विसं ।
नाब्बणं विसमन्वेति नत्थि पापं अकुब्बतो ॥९॥

हाताला जखम नसेल तर हातात विष घेता येईल,
जखम-रहीताला विष बाधत नाही, (तसे) न कर्त्याला दुष्कृत्य (बाधत नाही). (९)

यो अप्पदुट्ठस्स नरस्स दुस्सति सुद्धस्स पोसस्स अनङ्गणस्स ।
तमेच बालं पच्चेति पापं सुखुमो रजो' पटवातं' खित्तो ॥१०॥

जो शुद्ध, दोषरहीत, पोषीत माणसाचा द्वेष करतो, कांहि दृष्टता करतो,
तो अज्ञानी(च) वाइट होतो, जसे वाऱ्याच्या विरुद्ध फेकलेली सुक्ष्म धूळ ....
(फेकणाऱ्यावरच पडते). (१०)

**गब्भमेके उपज्जन्ति निरयं पापकम्मिनो।**
**सग्गं सुगतिनो यन्ति, परिनिब्बन्ति अनासवा॥११॥**

कांही गर्भात जन्मतात, दुष्कर्मी नरकात जातात,
सन्मार्गी स्वर्गात जातात, सत्चित्त निर्वाण-प्राप्त होतात. (११)

**न अन्तलिक्खे न समुद्दमज्झे न पब्बतानं विवरं पविस्स।**
**न विज्जति सो जगतिप्पदेसो यत्थट्ठितो मुच्चेय्य पापकम्मा॥१2॥**

न अन्तरिक्षात, न समुद्रात, न पर्वतावर, न विवरात शिरुन,
जगात असा प्रदेश विद्यमान नाही,
जेथे राहून (मानव) दुष्कृत्य (परिणाम) मुक्त राहील. (१२)

**न अन्तलिक्खे न समुद्दमज्झे न पब्बतानं विवरं पविस्स।**
**न विज्जति सो जगतिप्पदेसो यत्थट्ठितं नप्पसहेय्य मच्चू॥१3॥**

न अन्तरिक्षात, न समुद्रात, न पर्वतावर, न विवरात शिरुन,
जगात असा प्रदेश विद्यमान नाही,
जेथे राहून (मानव) मृत्यु मुक्त राहील. (१३)

**सब्बे तसन्ति दण्डस्स सब्बे भायन्ति मच्चुनो।**
**अत्तानं उपमं कत्वा न हनेय्य न घातये ॥१॥**

शिक्षेला सर्वच घाबरतात, मृत्यूला सारेच भितात,
सर्वांना स्वत:सारखेच समजावे, मारु नये, वध करु नये. (१)

**सब्बे तस्सन्ति दण्डस्स सब्बेसं जीवितं पियं।**
**अत्तानं उपमं कत्वा न हनेय्य न घातये ॥2॥**

शिक्षेला सर्वच घाबरतात, साऱ्यांना जीव प्रिय असतो,
सर्वांना स्वत:सारखेच समजावे, मारु नये, वध करु नये. (२)

**सुखकामानि भूतानि यो दण्डेन विहिंसति।**
**अत्तनो सुखमेसानो पेच्च सो न लभते सुखं ॥3॥**

सुखाच्या इच्छेने जो(मानव) सुख इच्छिणाऱ्या प्राण्यांना काठीने(शस्त्राने) मारतो
त्याला मरणोत्तरही सुख लाभत नाही. (३)

**सुखकामानि भूतानि यो दण्डेन न हिंसति।**
**अत्तनो सुखमेसानो पेच्च सो लभते सुखं ॥४॥**

सुखाच्या इच्छेने जो सुख इच्छिणाऱ्या प्राण्यांना काठीने मारीत नाही
त्याला मरणोत्तरही सुख लाभते. (४)

**मा वोच फरुसं कञ्चि वुत्ता पटिवदेय्यु तं।**
**दुक्खा हि सारम्भकथो पटिदण्डा फुसेय्यु तं ॥५॥**

कधिही कठोर बोलु नये, (त्याचे तसेच) प्रत्युत्तर मिळते,
कठोर बोलणे दुक्खदायक असते, त्याने तुम्हास दण्डाचेच प्रत्युत्तर मिळते. (५)

**सचे नेरेसि अत्तानं कंसो उपहतो यथा।**
**एस पत्तोसि निब्बाणं सारम्भो ते न विज्जति ॥६॥**

(तुम्हास) इजा झाली तरी काश्यासम* (धातु) अविचल राहिल्यास ....
तुम्हास निर्वाण प्राप्त झाले आहे, कांहीही विवाद राहिलेला नाही. (६)

* कासे - धातु जसा भरीव अविचल असतो तसे.

**यथा दण्डेन गोपालो गावो पचेति गोचरं।**
**एवं जरा च मच्चू च आयुं पाचेन्ति पाणिनं ॥७॥**

जसे गोपाल गाईंना काठीने हाकलीत रानात नेतात,
तसे वार्धक्य आणि मृत्यू प्राण्यांचे आयुष्य नेतात. (७)

**अथ पापानि कम्मानि करं बालो न बुज्झति।**
**सेहि कम्मेहि दुम्मेधो अग्गिदड्ढोव तप्पति ॥८॥**

दुष्कर्म करणाऱ्या अजाणास (काहिंच) समजत नाही,
(पण) याच कर्मांनी दुर्बुद्ध अग्नित जाळल्या सारखे तप्त होतो. (८)

**या दण्डेन अदण्डेसु अप्पदुट्ठेसु दुस्सति।**
**दसन्नमञ्ञंतरं ठानं खिप्पमेव निगच्छति ॥९॥**

जो काठीविरहीतास (निःशस्त्रास) काठीने (शस्त्राने),दोषरहीतास दोषाने त्रासतो,
त्याच्या ठाई या दहांपैकी एक (वेदना) त्वरित निर्माण होते .... (९)

**वेदनं फरुसं जानिं सरीरस्स च भेदनं।**
**गरुकं वापि आबाधं चित्तक्खेपं व पापुणे ॥१०॥**

कठोर वेदना, हानी, शरीर भेदन,
गंभीर आजार जडणे, मनोविकाराची प्राप्ति, (१०)

**राजतो वा उपस्सग्गं अब्भक्खानं व दारुणं।**
**परिक्खयं व ञातीनं भोगानं व पभङ्गुरं ॥११॥**

राजाकडून शिक्षा, तीव्र खोटे आरोप,
नातेवाईकांचा विनाश, संपत्तिचा विनाश. (११)

**अथवस्स अगारानि अग्गी डहति पावको।**
**कायस्स भेदा दुप्पञ्ञो निरयं सोपपज्जतिं ॥12॥**

त्याच्या घराला आग जाळुन टाकते,
अशा दुर्बुद्धाचा शरीर-नाशानंतर नरकात पुनर्जन्म होतो. (१२)

**न नग्गचरिया न जटा न पङ्का**
**नानासका थण्डिलसायिका वा।**
**रज्जो च जल्लं उक्कुटिकप्पधानं**
**सोधेन्ति मच्चं अवितिण्णकङ्खं ॥१३॥**

न नग्न राहुन, ना जटा वा चिखल (धारण करून),
न निराहार राहुन, ना कडक जमिनीवर झोपुन,
ना धुळ माखुन, ना उकिडवे बसुन, (मानवाची शुद्धी होते),
ज्याचे मन शुद्ध नाही, (त्या) मानवाची शुद्धी होत नाहा. (१३)

**अलङ्कतो चेपि समं चरेय्य**
**सन्तो दन्तो नियतो ब्रह्मचारि।**
**सब्बेसु भुतेसु निधाय दण्ड**
**सो ब्राह्मणो सो समणो सो स भिक्खू॥१४॥**

अलंकार लेऊनही ज्याचे आचरण योग्य आहे,
जो शांत, संयमी आणि ब्रह्मचारी आहे,
ज्याने सर्व प्रण्यांना त्रास देणे त्यागले आहे,
तोच ब्राह्मण, तोच श्रमण, तोच भिक्खु. (१४)

**हिरीनिसेधो पुरिसो कोचि लोकस्मि विज्जति।**
**यो निन्दं अप्पबोधति अस्सो भद्रो कसामिव॥१५॥**

लोकांत कांही मानव असे असतात, ज्यांना स्वताची लाज (दुष्कृत्यांपासुन)रोखते,
त्यांना निंदा असह्य असते जसा घोड्याला चाबुक. (१५)

**अस्सो यथा भद्रो कसानिविट्ठो आतापिनो संवेगिनो भवाथ।**
**सद्धाय सीलेन च विरियेन च समाधिना धम्मविनिच्छ्येन च।**
**सम्पन्नविज्जाचरणा पतिस्सता पहस्सथ दुक्खमिदं अनप्पकं॥१६॥**

जसा घोडा चाबकामुळे सरळ असतो, तसे वेगवान, तत्पर व्हावे,
श्रद्धा, शील, वीर्य, एकाग्रता, सदाचार निश्चय यांनी युक्त व्हावे,
विद्या आणि आचरणाने संपन्न, विचारवन्त व्हावे,
आणि मोठ्या दुक्खाचा नाश करावा. (१६)

**उदकं हि नयन्ति नेत्तका उसुकारा नमयन्ति तेजनं।**
**दारुं नमयन्ति तच्छका अत्तानं दमयन्ति सुब्बता॥१७॥**

(पाणी) नेणारा पाणी नेती, बाणकार बाण बनविती,
सुतार लाकुड बनविती, सुवृत्त (मानव) स्वत:ला कष्टवितात. (१७)

**कोनु हासो किमानन्दो निच्चं पज्जलिते सति।**
**अन्धकारेन ओनद्धा पदीपं न गवेस्सथ ॥१॥**

कसे हसणे ? काय आनंद ? जाणिवा नित्य जळत आहेत,
अंधाराने वेढलेल्या (मानवा), प्रदीपाचा शोध का घेत नाहीस ? (१)

**पस्स चित्तकतं बिम्बं अरुकायं समुस्सितं।**
**आतुरं बहुसङ्कप्पं यस्स नत्थि धुवं ठिति ॥2॥**

जखमांनी सुजलेल्या, व्रणांनी सजलेल्या या शरीराचे चित्र पहा,
रोग आणि नाना संकल्पांनी युक्त, याचे निश्चित स्थान नाही. (२)

**परिजिण्णमिदं रुपं रोगनिड्ढं पभङ्गुरं।**
**भिज्जति पूतिसन्देहो मरणन्तं हि जीवितं ॥3॥**

अतिशय जुने झालेले हे शरीर, रोग-स्थान आहे, क्षणभंगूर आहे,
सडून भग्न होणार आहे. सगळे जीव मरणारच.

**यानी'मानि अपत्थानि अलाबुनेव सारदे।**
**कापोतकानि अट्ठीनि तानि दिस्वान का रति ॥४॥**

शरद-काळी अपथ्य असणाऱ्या भोपळ्याचा सारखे (हे शरीर),
(शुभ्र)कबुतरा सारखी पांढरी हाडे, (हे) पाहून काय आसक्ति व्हावी ? (४)

**अठ्ठीनं नगरं कतं मंसलोहितलेपनं।**
**यत्थ जरा च मच्चु मानो मक्खो च ओहितो ॥५॥**

(हे शरीर,) हाडांचे वास्तव्य, त्यावर रक्ता-मांसाचे लेपन केले आहे,
त्यात वृद्धत्व, मृत्यू, गर्व, द्वेष लपविलेला आहे. (५)

**जीरन्ति वे राजरथा सुचिता अथो सरिरम्पि जरं उपेति।**
**सतं च धम्मो न जरं उपेति सन्तो हवे सब्भि पवेदयन्ति ॥६॥**

सुंदर रंगविलेला (सुचित्रित) राजरथ जुना होतो, असेच शरीर म्हातारे होते,
जागृत जीवन सिद्धांत (धम्म) जीर्ण होत नाही, असे सुजन विज्ञापित करतात. (६)

**अप्पस्सुतायं पुरिसो बलिवद्दो'व जीरति ।**
**मंसानि तस्स वड्ढन्ति पञ्ञा तस्स न वड्ढति ॥७॥**

थोडेसेच ऐकलेला (अज्ञानी) मानव, बैलासारखा ....
मांसाने वाढतो, म्हातारा होतो, त्याचे ज्ञान वाढत नाही. (७)

**अनेकजातिसंसारं सन्धाविस्सं अनिब्बिसं ।**
**गहकारकं गवेसन्तो दुक्खा जाति पुनप्पुनं ॥८॥**

अनेक जन्म विश्रांतीविना, सतत फिरतो आहे ....
(या) घराच्या* निर्मात्याला शोधीत, पुन्हा-पुन्हा जन्म वेदना (आहे). (८)

**गहकारक ! दिट्ठोसि पुन गेहं न काहसि ।**
**सब्बा ते फासुका भग्गा गहकूटं विसङ्खितं ।**
**विसङ्खारगतं चित्तं तण्हानं खयमज्झगा ॥९॥**

घराच्या* निर्मात्या ! (तु मला) दिसलास. (तु) पुन्हा घर करणार नाहिस,
सगळ्या बरगड्या मोडल्या आहेत, छप्पर नष्ट पावले आहे,
मन निशं:क झाले आहे, लालसांचा क्षय झाला आहे. (९)

**अचरित्वा ब्रह्मचरियं अलद्धा योब्बने धनं ।**
**जिण्णकोंचाव झायन्ति खीणमच्छेव पल्लले ॥१०॥**

ब्रह्मचर्य आचरले नाही, तारुण्यात धन प्राप्ति केली नाही,
(ते)बिन माशांच्या तलावात म्हाताऱ्या करकोच्या सारखे ध्यान लावतात. (१०)

**अचरित्वा ब्रह्मचरियं अलद्धा योब्बने धनं ।**
**सेन्ति चापातिखीणाव पुराणानि अनुत्थनं ॥११॥**

ब्रह्मचर्य आचरले नाही, तारुण्यात धन प्राप्ति केली नाही,
(ते) जुन्या धनुष्य-बाणा सारखे पश्चाताप करतात. (११)

* घर म्हणजे शरीर.
घराचा निर्माता म्हणजे 'स्व',
जो या शरीराची जोपासना करण्यातच धन्यता मानतो.

अत्तानं चे पियं जञ्ञा रक्खेय्य तं सुरक्खितं।
तिण्णमञ्ञतरं यामं पटिजग्गेय्य पण्डितो ॥१॥

जर स्वतःवर प्रेम करत असाल, स्वतःला श्रेष्ठ संरक्षित करा,
बुद्धिमन्त रात्रीच्या तीन प्रहरातला एक (प्रहर) जागृत असतात. (१)

अत्तानं एव पठमं पटिरूपे निसेवये।
अथञ्ञमनुसासेय्य न किलिस्सेय्य पण्डितो ॥2॥

जे योग्य आहे ते प्रथम स्वता करावे, नंतर इतरांना सांगावे,
म्हणजे बुद्धीमन्तांना डाग लागणार नाही. (२)

अत्तानञ्चे तथा कयिरा यथञ्ञमनुसासति।
सुदन्तो वत दम्मेथ अत्ता हि किर दुद्दमो ॥3॥

इतरांना जसे सांगतो तसेच स्वतः करतो, तो ....
इतरांना संयमित करतो. वास्तविक स्वतःला संयमित करणे कठीण आहे. (३)

अत्ता हि अत्तनो नाथो को हि नाथो परो सिया।
अत्तनाव सुदन्तेन नाथं लभति दुल्लभं ॥४॥

स्वतःच स्वतःचा स्वामि असतो, दुसरा कोण स्वामि असतो ?
स्वतःला संयमित करणाऱ्यास दुर्लभ स्वामित्वाचा लाभ होतो. (४)

अत्तनाव कतं पापं अत्तजं अत्तसम्भवं।
अभिमत्थति दुम्मेधं वजिरं वस्ममयं मणिं ॥५॥

स्वतः केलेले, स्वतः जन्म दिलेले, स्वतःतुन निर्माण झालेले दुष्कर्म,
दुर्बुद्धाला असे तोड-फोडते जसे वज्र दगडात रुतलेल्या मण्याला. (५)

यस्सच्चन्तदुस्सील्यं मालुवा सालमिवोततं।
करोति सो तथत्तानं यथानं इच्छति दिसो ॥६॥

ज्याचा दुराचार शाल वृक्षावर पसरलेल्या वेलीसारखा (पसरला) आहे,
तो तसेच करतो जसे शत्रु इच्छितो. (६)

**सुकरानि असाधूनि अत्तनो अहितानि च।**
**यं वे हितञ्च साधुञ्च तं वे परमदुक्करं ॥७॥**

अमंगल, स्वत:ला अहितकारी (कृत्य) करणे सोपे असते,
मंगल, स्वत:ला हितकारी (कृत्य) करणे खुप कठीण असते. (७)

**यो सासनं अरहतं अरियानं धम्मजीविनं।**
**पटिक्कोसति दुम्मेधो दिट्ठिं निस्साय पापिकं।**
**फलानि कट्ठकस्सेव अत्तहञ्ञाय फुल्लति ॥८॥**

जी शिकवण योग्य, सुजनांची जीवन-सिद्धांत,
यांची निन्दा करणाऱ्या दुर्बुद्धाचा (असा) नाश होतो,
जसे बांबुचे फळ स्वनाशासाठीच परिपक्व होते. (८)

**अत्तना'व कतं पापं अत्तना संकिलिस्सति।**
**अत्तना अकतं पाप अत्तना'व विसुज्झति।**
**सुद्धि असुद्धि पच्चत्तं नञ्ञो अञ्ञं विसोधये ॥९॥**

स्वत: केलेले दुष्कर्म स्वत:ला कलुषित करतात,
स्वत: न केलेले दुष्कर्म स्वत:ला शुद्ध करतात,
(प्रत्येकाची) शुद्धी-अशुद्धी वेग-वेगळी असते,
(कुणीही) दुसरा, दुसऱ्याला शुद्ध करीत नाही. (९)

**अत्तदत्थं परत्थेन बहुनापि न हापये।**
**अत्तदत्थमभिञ्ञायसदत्थपसुतो सिया ॥१०॥**

परोपकारासाठी स्वार्थाची खुप उपेक्षा करु नये,
स्वार्थाला नीट समजुन घेवुन आत्मकल्याण पहावे. (१०)

**हीनं धम्मं न सेवेय्य,पमादेन न संवसे।**
**मिच्छदिट्ठि न सेवेय्य न सिया लोक-वड्ढनो ॥१॥**

हीन कृत्य करु नये, बेपर्वा राहु नये,
वाइट दृष्टी ठेवु नये, लोक-वृद्धी (जन्म वृद्धीची अपेक्षा) बाळगु नये. (१)

**उत्तिट्ठे नप्पमज्जेय्य धम्मं सुचरितं चरे।**
**धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च ॥2॥**

उठा, अजागृत राहु नका, सैद्धांतिक (धम्मा प्रमाणे) जीवन जगा,
सदाचाराने रहाणारे येथे आणि परलोकांतही सुखात रहातात. (२)

**धम्मं चरे सुचरितं न तं दुच्चरितं चरे।**
**धम्मचारी सुखं सेति अस्मिं लोके परम्हि च ॥3॥**

सैद्धांतिक (धम्मा प्रमाणे) जीवन जगा, दुर्गुणांनी राहु नका,
सदाचाराने रहाणारे येथे आणि परलोकांतही सुखात रहातात. (३)

**यथा बुब्बुळकं पस्से यथा पस्से मरीचकं।**
**एवं लोके अवक्खन्तं मच्चुराजा न पस्सति ॥४॥**

जसे बुडबुड्याकडे पहावे, जसे मृगजळाकडे पहावे,
तसे (निरीच्छपणे) जो जीवनाकडे पहातो, त्याच्याकडे मृत्युराजा पहात नाही. (४)

**एथं पस्सथिमं लोकं चित्त राजरथूपमं।**
**यत्थबाळा विसीदन्ति, नत्थि सङ्गो विजानतं ॥५॥**

चित्रासारख्या (सुंदर) राजरथाप्रमाणे या जगाला पहा,
इथे अज्ञानी धडपडतात, सुज्ञान आसक्त होत नाहीत. (५)

**यो च पुब्बे पमज्जित्वा पच्छा सो नप्पमज्जति।**
**सो'मं लोकं पभासेति अब्भा मुत्तोव चन्दिमा ॥६॥**

जे आधी बेपर्वा असतात, (जाणविल्या) नंतर बेपर्वा असत नाहीत,
ते ढग बाजूला झालेल्या चंद्रा सारखे या जगात प्रकाशित होतात. (६)

**यस्स पापं कतं कम्मं कुसलेन पिथीयति।**
**सोमं लोकं पभासेति अब्भा मुत्तोव चन्दिमा ।।७।।**

जे केलेल्या दुष्कृत्यांना, सत्कृत्यांनी झाकुन टाकतात,
ते ढग बाजूला झालेल्या चंद्रा सारखे या जगात प्रकाशित होतात. (७)

**अन्धभुतो अयं लोको तनुकेत्थ विपस्सति।**
**सकुन्तो जालमुत्तोव अप्पो सग्गाय गच्छति ।।८।।**

हे जग अन्ध आहे, इथे थोडेच पहातात,
जाळ्यातून सुटलेल्या पक्षांसारखे थोडेच लोक स्वर्गात (सुखाकडे) जातात. (८)

**हंसादिच्चपथे यन्ति आकासे यन्ति इद्धिया।**
**नीयन्ति धीरा लोकम्हा जेत्वा मारं सवाहिणिं ।।९।।**

हंस सुर्यपथावर (आकाशात) जातात, ऋद्धीप्राप्त आकाशातून जातात,
सेनेसह (आलेल्या) भुलैयाला जिंकतात, ते या लोकांतून निघून जातात. (९)

**एकं धम्मं अतीतस्स मुसावादिस्स जन्तुनो।**
**वितिण्णपरलोकस्स नत्थि पापं अकारियं ।।१०।।**

जो एका (सत्य) सदाचाराला पार करतो, जो खोटे बोलणारा जीव आहे,
ज्याने परलोक तुच्छिला आहे, तो करणार नाही असे दुष्कृत्य नाही. (१०)

**न वे कदरिया देवलोकं वजन्ति बाला हवे नप्पसंसन्ति दानं।**
**धीरो च दानं अनुमोदमानो तेनेव सो होति सुखी परत्थ ।।११।।**

कंजुस महाजन-लोकी जात नाहीत, अज्ञानी दानाची प्रशंसा करीत नाहीत,
बुद्धिवान दानाचे अनुमोदन करतात, त्यामुळे परलोकात सुखी होतात. (११)

**पथव्या एकरज्जेन सग्गस्स गमनेन वा।**
**सब्ब लोकाधिपच्चेन सोतापत्तिफलं वरं ।।१2।।**

एकट्याने पृथ्वीचा राजा होण्यापेक्षा, स्वर्गात जाण्यापेक्षा,
सर्व लोकांचा अधिपति होण्यापेक्षा, श्रेष्ठ आहे, सैद्धांतिक जीवनपथाचे फळ.(१२)

**यस्स जितं नावजीयति जितमस्स नो याति कोचि लोके।**
**तं बुद्धमनन्तगोचरं अपदं केन पदेन नेस्सथ ? ॥१॥**

ज्याच्या जयाचा अविजय होणार नाही,
ज्याच्या जयापर्यंत (या) लोकांतील कोणीही जाणार नाही,
त्या विस्तीर्ण हिरवळ रुपी निष्कलंक (निष्चिन्ह) बुद्धांना (तुम्ही आपल्या जीवनात) कोणत्या मार्गाने न्याल ? (१)

**यस्स जालिनी विसत्तिका तण्हा नत्थि कुहिञ्चि नेतवे ।**
**तं बुद्धमनन्तगोचरं अपदं केन पदेन नेस्सथ ? ॥2॥**

ज्याला विषाचे जाळे (पसरविणारी) तृष्णा कोठेही नेऊ शकत नाही,
त्या विस्तीर्ण हिरवळ रुपी निष्कलंक (निष्चिन्ह) बुद्धांना (तुम्ही आपल्या जीवनात) कोणत्या मार्गाने न्याल ? (२)

**ये झाणपसुता धीरा नेक्खम्मुपसमे रता ।**
**देवापि तेसं पिहयन्ति सम्बुद्धानं सतीमतं ॥3॥**

जो ध्यनस्थ, धीर, संसार (सुख) त्यगूनही संतुष्ट आहे,
त्या स्मृतिवान (विचारवन्त) सम्बुद्धावर देव (श्रेष्ठ जन) प्रेम करतात. (३)

**किच्छो मनुस्सपटिलाभो किच्छं मच्चानं जीवितं ।**
**किच्छं सद्धम्मसवणं किच्छो बुद्धानं उप्पादो ॥४॥**

(उत्तम) मानव जीवन प्राप्त होणे अवघड, मर्त्य जीवन जगणे अवघड,
उत्तम धम्म (जीवन त्तव) ऐकणे अवघड, बुद्धांचे उत्पन्न हाणे अवघड. (४)

**सब्ब पापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा ।**
**सच्चित्तपरियोदपनं एतं बुद्धान सासनं ॥5॥**

सर्व पापे (दुर्वर्तन) न करणे, सत्कृत्याचा अवलंब करणे,
चित्त शुद्ध करणे, हाच बुद्धांचा सिद्धान्त. (हीच बुद्धांची शिकवण) (५)

**खन्ती परमं तपो तितिक्खा निब्बाणं परमं वदन्ति बुद्धा।**
**नहि पब्बजितो परूपघाती न समणो होति परं विहेठयन्ती ॥६॥**

बुद्ध सांगतात, 'शान्ती, सहनशीलता अत्युच्च साधना आहे, निर्वाण अत्युच्च आहे,
पर-घात करणारा प्रवज्जित होत नाही, दुसऱ्यांना त्रासवणारा श्रमण होत नाही.'(६)

**अनूपवादो अनूपघातो पातिमोक्खे च संवरो।**
**मत्तञ्ञुता च भत्तस्मिं पन्तञ्च सयनासनं।**
**अधिचित्ते च आयोगो एतं बुद्धान सासनं ॥७॥**

निन्दा न करणे, घात न करणे, भिक्खु नियमांचे पालन करणे,
माफक भोजन, एकान्तात शयन-आसन,
एकाग्र-चित्ताचा प्रयत्न, हाच बुद्धांचा सिद्धान्त. (७)

**न कहापणवस्सेन तित्ति कामेसु विज्जति।**
**अप्पसादा दुक्खा कामा इति विञ्ञाय पण्डितो ॥८॥**

सोन्या-नाण्यांच्या वर्षावानेही इच्छांची तृप्ती होत नाही,
काम-भोग अल्पस्वादी-वेदनादायी आहेत हे ज्ञानीजन जाणतात. (८)

**अपि दिब्बेसु कामेसु रतिं सो नाधिगच्छति।**
**तण्हक्खयरतो होति सम्मासम्बुद्धसावको ॥९॥**

परंतु (ज्ञानीजन) दिव्य काम-भोगातही आसक्ति प्राप्त करीत नाहीत.
सम्यक-सम्बुद्धां चे शिष्य तृष्णा-नाशात मग्न रहातात. (९)

**बहु वे सरणं यन्ति पब्बतानि वनानि च।**
**आरामरुक्खचेत्यानि मनुस्सा भयतज्जिता ॥१०॥**

अनेक जण (मानव) पर्वत, वन इत्यादीना शरण जातात,
(तसेच) भयभीत होउन उद्यान, वृक्ष, चैत्य (इत्यादींनाही शरण जातात.) (१०)

**नेतं खो सरणं खेमं नेतं सरणमुत्तमं।**
**नेतं सरणमागम्म सब्बदुक्खा पमुच्चति ॥११॥**

हे शरण जाणे कल्याणकारी नाही, हे शरण जाणे उत्तम नाही,
हे शरण जाणे सर्व वेदनांचे उच्चाटण करणारे नाही. (११)

**यो च बुद्धंच धम्मंच संघंच सरणं गतो।**
**चत्तारि अरियसच्चानि सम्मपञ्ञाय पस्सति ॥१२॥**

जो बुद्ध, धम्म आणि संघ अनुसरण करतो,
सम्यक प्रज्ञेने चार आर्यसत्यांचे आकलन करतो, (१२)

**दुक्खं दुक्खसमुप्पादं दुक्खस्स च अतिक्कमं।**
**अरियञ्चठ्ठांगिकं मग्गं दुक्खूपसमगामिनं ॥१३॥**

वेदना, वेदनेचे कारण, वेदनेचे निवारण,
वेदना निवारणाचा आर्य अष्टांग मार्ग *(आकलन करतो), (१३)

**एतं खो सरणं खेमं एतं सरणमुत्तमं।**
**एतं सरणमागम्म सब्बदुक्खा पमुच्चति ॥१४॥**

हेच (त्याचे) कल्याणकारी अनुसरण, उत्तम अनुसरण,
याच अनुसरणाने सर्व वेदनांचे उच्चाटन होते. (१४)

**दुल्लभो पुरिसाजञ्ञो, न सो सब्बत्थ जायति।**
**यत्थ सो जायति, धीरो तं कुलं सुखमेधति ॥१५॥**

(उत्तम) मानव जीवन दुर्लभ, ते सर्वांना प्राप्त होत नाही,
ज्याला ते प्राप्त होत, त्या ज्ञानी(मानवा)च्या कुळाचे सुख वाढते. (१५)

**सुखो बुद्धानं उप्पादो सुखा सद्धम्मदेसना।**
**सुखा संघस्स सामग्गी समग्गानं तपो सुखो ॥१६॥**

बुद्धांचे अस्तित्व सुखकारक, सद्धम्माचा उपदेश सुखकारक,
एकत्रित सुजनांचे (संघाचे) एकत्व सुखकारक, एकत्रित साधना सुखकारक. (१६)

*सम्यक दृष्टी, सम्यक संकल्प, सम्यक वाचा, सम्यक कृती,
सम्यक जीविका, सम्यक प्रयत्न, सम्यक स्मृति, सम्यक साधना हे अष्टांग मार्ग.

**पूजारहे पूजयतो बुद्धे यदि व सावके।**
**पपञ्चसमतिक्कन्ते तिण्णसोकपरिद्दवे ॥१७॥**

पुज्जनीय बुद्ध व त्यांचे शिष्य,
जे प्रपंचाच्या आणि शोकाच्या पल्याड (गेले) आहेत, (१७)

**ते तादिसे पूजयतो निब्बुते अकुतोभये।**
**न सक्का पुञ्ञं संखातुं इमेत्तमिति केनचि ॥१८॥**

अशा शांत, निर्भय (बुद्ध व त्यांचे शिष्य) यांच्या पुजनाचे
पावित्र्य (पुण्य) 'फक्त इतके' असे सांगणे कोणासही शक्य नाही. (१८)

**सुसुखं वत ! जीवाम वेरिनेसु अवेरिनो ।**
**वेरिनेसु मनुस्सेसु विहाराम अवेरिनो ॥१॥**

निश्चित सुखी आहोत ! वैर करणाऱ्यांत अवैरी राहून,
वैरी माणसांत आम्ही अवैरी विहार करतो. (१)

**सुसुखं वत ! जीवाम आतुरेसु अनातुरा ।**
**आतुरेसु मनुस्सेसु विहराम अनातुरा ॥2॥**

निश्चित सुखी आहोत ! रोगी जीवांमध्ये निरोगी राहून,
रोगी माणसांत आम्ही निरोगी विहार करतो. (२)

**सुसुखं वत ! जीवाम उस्सुकेसु अनुस्सुका ।**
**उस्सुकेसु मनुस्सेसु विहराम अनुस्सुका ॥3॥**

निश्चित सुखी आहोत ! आसक्त माणसांत अनासक्त राहून,
आसक्त माणसांत आम्ही अनासक्त विहार करतो. (३)

**सुसुखं वत ! जीवाम येसं नो नत्थि किञ्चनं ।**
**पीतिभक्खा भविस्साम देवा अभिस्सरा यथा ॥४॥**

निश्चित सुखी आहोत ! आम्हा जवळ कांहीच नाही,
प्रियदर्शी महाजनां (देवां) सारखे, प्रेम हेच (आमचे) भोजन आहे ( (४)

**जयं वेरं पसवति दुक्खं सेति पराजितो ।**
**उपसन्तो सुखं सेति हित्वा जयपराजयं ॥५॥**

जयाने वैर निर्माण होते, पराजित दुक्खात रहातो,
शांतचित्त (मानव) जय-पराजय सोडून सुखाने झोपतो. (५)

**नत्थि रागसमो अग्गि, नत्थि दोससमो कलि ।**
**नत्थि खधासमा दुक्खा नत्थि सन्तिपरं सुखं ॥६॥**

आसक्ति सारखा अग्नि नाही, द्वेषा सारखा पराजय नाही,
(पाच)*स्कन्धां सारखे दुक्ख नाही, शांती सारखे सुख नाही. (६)

* रुप, वेदना, संज्ञा, संस्कार, विज्ञान हे पाच स्कन्ध.

**जिघच्छा परमा रोगा, सङ्खारा परमा दुखा।**
**एतं ञत्वा यथाभुतं निब्बाणं परमं सुखं ॥७॥**

भुक हा मोठा रोग आहे, संस्कार (भौतिकता) हे मोठे दुक्ख आहे,
या यथार्थाला जो जाणतो, त्याच्यासाठी निर्वाण हे मोठे सुख आहे. (७)

**आरोग्य परमा लाभा, सन्तुट्ठीपरमं धनं।**
**विस्सासपरमा ञाती, निब्बाणं परमं सुखं ॥८॥**

निरोगी असणे खुप लाभदायक, संतुष्टी श्रेष्ठ संपदा,
विश्वास हा चांगला नातेवाइक, निर्वाण श्रेष्ठ सुख. (८)

**पविवेकरसं पीत्वा रसं उपसमस्स च।**
**निद्दरो होति निप्पापो धम्मपीतिरसं पिबं ॥९॥**

एकान्तवासाचे व शांतीचे रसपान केल्याने,
(मानव) निर्भय होतो, सदाचार रसपानाने निष्पाप होतो. (९)

**साधु दस्सनमरियानं सन्निवासो सदा सुखो।**
**अदस्सनेनं बालानं निच्चमेव सुखी सिया ॥१०॥**

सज्जनांचे दर्शन चांगले, संगत सदा सुखकर,
अज्ञानींचे दर्शनही न होणे नित्य सुखकर. (१०)

**बालसंगतचारि हि दीघमद्धानं सोचति।**
**दुक्खो बालेहि संवासो अमित्तेनेव सब्बदा।**
**धीरो च सुखसंवासो ञातीनं' व समागमो ॥११॥**

अज्ञानींची संगती करणारा खुप काळ पर्यंत पश्चाताप करतो,
अज्ञानींची व अमित्राची(शत्रुची) संगती सदैव सारखीच दुक्खदायक,
बुद्धिमानांची संगती नातेवाइकांच्या मेळ्या सारखी सुखद असते. (११)

**तस्मा हि धीरं च पञ्ञञ्ञ बहुस्सुतं च धोरय्हसीलं वतवन्तमरियं।**
**तं तादिसं सप्पुरिसं सुमेधं भजेथ नक्खत्तपथं'व चन्दिमा ॥१२॥**

म्हणून बुद्धिवान, प्रज्ञावान, बहुश्रुत, शीलभार साहणारा, व्रतस्थ सुजन, आणि
सुबुद्ध सज्जनांची संगत करावी, जसा चन्द्र नक्षत्र मार्गाची सोबत करतो. (१२)

**अयोगे युञ्जमत्तानं योगस्मिञ्च अयोजयं।**
**अत्थं हित्वा पियग्गाही पिहेत'त्तानुयोगिनं ॥१॥**

स्वतःला अनुचित कार्यात लावाणारा, उचित कार्यात न लावणारा,
अर्थपूर्ण सोडून प्रियाच्या मागे जाणारा, (त्याने) आत्मसाधनेची इच्छा करावी.(१)

**मा पियेहि समागञ्छि अप्पियेहि कुदांचन।**
**पिवानं अदस्सनं दुक्खं अप्पियानञ्च दस्सनं ॥2॥**

प्रिय(जनां)च्या संगतीत राहु नका, अप्रियांच्या (संगतीत) कधिच नका,
प्रियजनांचे दर्शन न होणे अप्रियजनांचे दर्शन होणे दुक्खाचे असते. (२)

**तस्मा पियं न कयिराथ पियपायो हि पापको।**
**गन्था तेसं न विज्जन्ति येसं नत्थि पियाप्पियं ॥3॥**

म्हणुन (कांहीही) प्रिय करु नका, प्रिय निघुन जाणे वाइट (वाटते),
त्यांना बंधन नसते, ज्यांना प्रिय-अप्रिय असत नाही. (३)

**पियतो जायते सोको पियतो जायते भयं।**
**पियतो विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥४॥**

प्रिय मुळे शोक उत्पन्न होतो, प्रिय मुळे भीती उत्पन्न होते,
जो प्रिय पासुन मुक्त असतो, त्याला शोक नसतो, तर भीती कशी ? (४)

**पेमतो जायते सोको पेमतो जायते भयं।**
**पेमतो विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥५॥**

प्रेमा मुळे शोक उत्पन्न होतो, प्रेमा मुळे भीती उत्पन्न होते,
जो प्रेमा पासुन मुक्त असतो, त्याला शोक नसतो, तर भीती कशी ? (५)

**रतिया जायते सोको रतिया जायते भयं।**
**रतिया विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥६॥**

आसक्ति मुळे शोक उत्पन्न होतो, आसक्ति मुळे भीती उत्पन्न होते,
जो आसक्ति पासुन मुक्त असतो, त्याला शोक नसतो, तर भीती कशी ? (६)

**कामतो जायते सोको कामतो जायते भयं।**
**कामतो विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥७॥**

भोगा मुळे शोक उत्पन्न होतो, भोगा मुळे भीती उत्पन्न होते,
जो भोगा पासुन मुक्त असतो, त्याला शोक नसतो, तर भीती कशी ? (७)

**तण्हाय जायते सोको तण्हाय जायते भयं।**
**तण्हाय विप्पमुत्तस्स नत्थि सोको कुतो भयं ॥८॥**

लालसे मुळे शोक उत्पन्न होतो, लालसे मुळे भीती उत्पन्न होते,
जो लालसे पासुन मुक्त असतो, त्याला शोक नसतो, तर भीती कशी ? (८)

**सीलदस्सनसंपन्नं धम्मट्ठे सच्चवादिनं।**
**अत्तनो कम्मकुब्बानं तं जनो कुरुते पियं ॥९॥**

जो शील संपन्न, दृष्टी(ज्ञान) संपन्न आहे, सदाचाराने सत्यवचनी आहे,
स्वताचे काम करणारा आहे, त्यास (मानवास) लोक प्रेम करतात. (९)

**छन्दजातो अनक्खाते मनसा च फुटो सिया।**
**कामेसु च अप्पटिबद्धचित्तो उद्धंसोतो'ति वुच्चति ॥१०॥**

ज्याला अव्याख्याची* अभिलाषा आहे आणि (त्याला) मनाने स्पर्श केला आहे,
जो काम-भोगात अनासक्त असतो, त्याला उर्ध्वगामी # म्हणतात. (१०)

**चिरप्पवासिं पुरिसं दूरतो सोत्थिमागतं।**
**ञातिमित्ता सुहज्जा च अभिनन्दति आगतं ॥११॥**

फार पुर्वी प्रवासाला गेलेला माणूस, दूरवरुन सुखरूप (परत) येतो,
तेंव्हा नातेवाइक-मित्र सुहृदयाने, येणाऱ्याचे अभिनंदन करतात. (११)

**तथेव कतपुञ्ञम्पि अस्मा लोका परं गतं।**
**पुञ्ञानि पटिगण्हन्ति पियं ञातीव आगतं ॥१2॥**

याच प्रकारे सत्कर्म करणाराचे या लोकांतुन दुसरीकडे ....
त्याचे सत्कर्म स्वागत करतात, जसे नातेवाइक प्रिय (व्यक्ति) चे (करतात). (१२)

* अव्याख्य - (ज्याची व्याख्या नाही), निर्वाण  # उच्च स्त्रोताकडे जाणारा

**कोधं जहे विप्पजहेय्य मानं सञ्ञोजनं सब्बमतिक्कमेय्य ।**
**तं नामरुपस्मिं असज्जमानं अकिञ्चनं नानुपतन्ति दुक्खा ॥१॥**

क्रोधाचा त्याग करावा, अभिमानाचा त्याग करावा, सर्व बंधनांवर आक्रमक व्हावे,
नाम-रुपात अनासक्त, नि:शेष असावे, (त्यायोगे) दुक्ख मागे येत नाहीत. (१)

**यो वे उप्पतितं कोधं रथं भन्तं'व धारये ।**
**तमहं सारथिं ब्रूमि रस्मिग्गाहो इतरो जनो ॥2॥**

जो उसळणाऱ्या क्रोधाला स्थिर करतो, पथभ्रष्ट रथाला जसे (हुशार सारथी),
त्यालाच मी (सच्चा) सारथी म्हणतो, इतर लोक (फक्त) दोरी धरणारे. (२)

**अक्कोधेन जिने कोधं असाधुं साधुना जिने ।**
**जिने कदरियं दानेन सच्चेन अलिकवादिनं ॥3॥**

अक्रोधाने क्रोधाला जिंकावे, वाईटाला उत्तमाने जिंकावे,
कंजुषपणाला दानाने जिंकावे, सत्याने खोटे बोलणे जिंकावे. (३)

**सच्चम भणे न कुज्झेय्य, दज्जा'प्पस्मिम्पि याचितो ।**
**एतेहि तीहि ठानेहि गच्छे देवान सन्तिके ॥४॥**

सत्य बोलावे, क्रोधित होउ नये, मागणाऱ्यास (स्वताजवळ) कमी असताही द्यावे,
या तीन (गोष्टीं) ना (जीवनात) स्थान असणारा श्रेष्ठजनां जवळ जातो. (४)

**अहिंसका ये मुनयो निच्चं कायेन संवुता ।**
**ते यन्ति अच्चुतं ठानं यत्थ गन्त्वा न सोचरे ॥५॥**

जो ज्ञानी अहिंसक (वृत्तीचा) आहे, सदैव शरीर-संयमित आहे,
तो पतन-रहित स्थानी जातो, जेथे गेल्यावर पश्चाताप होत नाही. (५)

**सदा जागरमानानं अहोरत्तानुसिक्खिनं ।**
**निब्बान अधिमुत्तानं अत्थं गच्छन्ति आसवा ॥६॥**

जे सदैव जागृत असतात, अहोरात्र (सन्मार्ग) शिकत असतात,
निर्वाणाचा संकल्प करतात, त्यांच्यातील दुर्विचार (निघुन) जातात. (६)

**पोराणमेतं अतुल ! नेतं अज्जतनामिव ।**
**निन्दन्ति तुण्हीमासीनं निन्दन्ति बहुभाणिनं ।**
**मितभाणिनम्पि निन्दन्ति नत्थि लोको अनिन्दितो ॥७॥**

हे अतुल* ! हे फार जुने आहे, हे असे आधुनिक नाही,
गप्प रहाणाऱ्याची निंदा होते, खुप बोलणाऱ्याची निंदा होते,
कमी बोलणाऱ्याची निंदा होते, निंदा न होणारा लोकांत (कुणीही) नाही. (७)

**न चाहु च भविस्सिति न चेतरहि विज्जति ।**
**एकन्तं निन्दितो पोसो एकन्तं वा पसंसितो ॥८॥**

(असा मानव) आता नाही, भविष्यातही नाही, दुसरीकडेही नाही,
ज्याची केवळ निंदा होते, वा केवळ प्रशंसा होते. (८)

**यं चे विञ्ञू पसंसन्ति अनुविच्च सुवे सुवे ।**
**अच्छिद्दवुत्तिं मेधाविं पञ्ञासीलसमाहितं ॥९॥**

ज्ञानी (लोक) सुजाणता त्यांची प्रशंसा रोज रोज करतात,
जे छिद्र(दोष)रहीत वृत्तीचे, सुज्ञ, प्रज्ञावान, शीलवान असतात .... (९)

**नेक्खं जम्बोनदस्सेव को तं निन्दितुमरहति ।**
**देवापि तं पसंसन्ति ब्रह्मणाऽपि पसंसितो ॥१०॥**

जम्बोनदाच्या# मोहरे सारख्या (मानवा)ची निंदा करण्यायोग्य कोण आहे ?
(देवता)श्रेष्ठजन त्यांची प्रशंसा करतात, ब्रह्मा त्यांची प्रशंसा करतात. (१०)

**कायकोपं रक्खेय्य कायेन संवुतो सिया ।**
**कायदुच्चरितं हित्वा कायेन सुचरितं चरे ॥११॥**

शरीर क्रोधापासुन रक्षावे, शरीर संयमित ठेवावे,
शारीरीक दुराचारा सोडून शरीराने सदाचारी रहावे. (११)

**वचीपकोपं रक्खेय्य वाचाय संवुतो सिया ।**
**वच्चीदुच्चरितं हित्वा वाचाय सुचरितं चरे ॥१२॥**

वणीस क्रोधापासुन रक्षावे, वाणी संयमित ठेवावी,
वाणीचे दुराचारा सोडून वाणीने सदाचारी रहावे. (१२)

* अतुल नावाचा शिष्य    #जम्बोनद राजाची सुवर्णमुद्रा

मनोपकोपं रक्खेय्य मनसा संवुतो सिया।
मनोदुच्चरितं हित्वा मनसा सुचरितं चरे॥१३॥

मनास क्रोधापासुन रक्षावे, मन संयमित ठेवावे,
मनाचे दुराचारा सोडून मनाने सदाचारी रहावे. (१३)

कायेन संवुता धीरा अथो वाचाय संवुता।
मनसा संवुता धीरा ते वे सुपरिसंवुता॥१४॥

शरीराने संयमित तसेच वाणीने संयमित सुज्ञ,
मनाने संयमित सुज्ञ, तेच सुसंयमित असतात. (१४)

**पण्डुपलासो' व दानिसि, यमपुरिसापि च ते उपट्ठिता।**
**उय्योगमुखे च तिट्ठसि पाथेय्यम्पि च ते न विज्जति ॥१॥**

आता तु पिवळ्या (पिकल्या) पाना सारखा आहेस, जवळ यमदूत उभे आहेत,
तु मृत्युद्वारी उभा आहेस, आणि तुझ्याजवळ (प्रवासासाठी) शिदोरीही नाही. (१)

**सो करोहि दीपमत्तनो खिप्पं वायम पण्डितो भव।**
**निद्धन्तमलो अनङ्गणो दिब्बं अरियभुमिमेहिसि ॥2॥**

म्हणून तु स्वतःच (स्वतःचा) दीपक हो, त्वरीत प्रयत्न करून ज्ञानी हो,
म्हणजे मलरहीत, दोषरहीत होउन तु दिव्य आर्य-भुमि प्राप्त करशील. (२)

**उपनीतवयो च दानिसि सम्पयातोसि यमस्स सन्तिके।**
**वासोपि च ते नत्थि अन्तरा पाथेय्यम्पि च ते न विज्जति ॥3॥**

आता तुझे आयुष्य (अंतापर्यंत) आणले आहे, तु यमाजवळ गेलेला आहेस,
मधे कोठेही निवारा नाही, आणि तुझ्याजवळ शिदोरीही नाही. (३)

**सो करोहि दीपमत्तनो खिप्पं वायम पण्डितो भव।**
**निद्धन्तमलो अनङ्गणो न पुन जातिजरं उपेहिसि ॥४॥**

म्हणून तु स्वतःच (स्वतःचा) दीपक हो, त्वरीत प्रयत्न करून ज्ञानी हो,
म्हणजे मलरहीत, दोषरहीत होउन तु पुन्हा जन्म-मृत्यु प्राप्त न करशील. (४)

**अनुपब्बेन मेधावी थोकथोकं खणे खणे।**
**कम्मारो रजतस्सेव निद्धमे मलमत्तनो ॥५॥**

प्रज्ञावान क्रमाने क्षणी-क्षणी थोडा-थोडा ....
स्वतःचा मळ दूर करतो, जसे सोनार चांदीचा (मळ दूर करतो). (५)

**अयसा'व मलं समुट्ठितं तदुट्ठाय तमेव खादति।**
**एवं अतिधोनचारिनं सककम्मानि नयन्ति दुग्गति ॥६॥**

(जसा) लोखंडावर मळ (गंज) चढतो आणि तेथेच स्वताला (लोखंडाला) खातो,
तसे (सदाचाराची) मर्यादा उल्लंघणारे स्वकर्मानेच दुर्गतीला जातात. (६)

**असज्झायमला मन्ता अनुट्ठानमला घरा।**
**मलं वण्णस्स कोसज्जं पमादो रक्खतो मलं ॥७॥**

पठण नसणे मंत्रांचा मळ, अकार्यशीलता घराचा मळ,
आळस (शरीर) वर्णाचा मळ, निष्काळजी राखणदाराचा मळ असतो. (७)

**मलित्थिया दुच्चरितं मच्छेरं ददतो मलं।**
**मला वे पापका धम्मा अस्मिं लोके परम्हि च ॥८॥**

दुराचार स्त्रीचा मळ, कंजुसपणा दात्याचा मळ,
दुष्कृत्य सदवर्तनाचा मळ आहे, या लोकांत व दुसऱ्या लोकातही. (८)

**ततो मला मलतरं अविज्जा परमं मलं।**
**एतं मलं पहत्वान निम्मला होथ भिक्खवो ॥९॥**

या सर्व मळांहुन अधिक मळ आहे, अविद्या हा मोठ्ठा मळ.
सुजनांनो, या मळाला दुर करुन निर्मळ व्हा. (९)

**सुजीवं अहिरीकेन काकसूरेन धंसिना।**
**पक्खन्दिना पगब्भेन संकिलिट्ठेन जीवितं ॥१०॥**

बळकावण्यात शुर, निर्लज्ज कावळ्या समान,
उच्छृंखल, दुस्साहसी, कलुषित जीवन जगणे सोपे आहे. (१०)

**हिरीमता च दुज्जीवं निच्चं सुचिगवेसिना।**
**अलीनेन'प्पगब्भेन सुद्धाजीवेन पस्सता ॥११॥**

दुराचारास लज्जित, नित्य पावित्र्याचा ध्यास असणारे,
शुद्धतेत निसंकोच व विस्तृत, जीवन जगणे कठीण आहे. (११)

**यो पाणमतिपातेति मुसावादञ्च भासति।**
**लोके अदिन्नं आदियति परदारञ्च गच्छति ॥१2॥**

जो या जगात प्राण्यांस मारतो, खोटे वचन बोलतो,
जे दिलेले नाही ते घेतो, परस्त्रि कडे जातो, .... (१२)

**सुरामेरयपानञ्च यो नरो अनुयुञ्जति।**
**इधेवमेसो लोकस्मिं मूलं खनति अत्तनो ॥१३॥**

जो नशा-दारु पितो, असा मानव, प्रयत्नित असतो ....
इथेच, याच लोकांत, स्वतःचा पाया (आधार) खणण्यात. (१३)

**एवं भो पुरिस! जानाहि पापधम्मा असञ्ञता।**
**मा तं लोभो अधम्मो च चिरं दुक्खाय रन्धयुं ॥१४॥**

म्हणुन हे मानवा! दुराचार, असंयम जाणुन घे,
तुझे लोभ आणि दुराचार तुला कायमचे दुक्खात लोटु नयेत. (१४)

**ददन्ति वे यथासद्धं यथा पसादनं जनो।**
**तत्थ यो मंकु भवति परेसं पानभोजने।**
**न सो दिवा वा रत्तिं वा समाधिं अधिगच्छति ॥१५॥**

लोक श्रद्धेनुसार, प्रसन्नतेनुसार दान देतात,
तेथे, जे इतर जनांच्या खान-पानात उत्साहहीन असतात,
ते दिवसा किंवा रात्री एकाग्रचित्त होत नाहीत. (१५)

**यस्स चेतं समुच्छिन्नं मूलघच्चं समूहतं।**
**स वे दिवा वा रत्तिं वा समाधिं अधिगच्छति ॥१६॥**

या (इर्ष्या) भावनेचे संपुर्णपणे, मुळासकट उच्चाटन करतात,
ते दिवसा किंवा रात्री (कधीही) एकाग्रचित्त होतात. (१६)

**नत्थि रागसमो अग्गि नत्थि दोससमो गहो।**
**नत्थि मोहसमं जालं नत्थि तण्हासमा नदी ॥१७॥**

आसक्ति सारखी आग नाही, द्वेषासारखा ग्रह नाही,
अज्ञाना सारखे जाळे नाही, तृष्णे (लालसे) सारखा प्रवाह (नदी) नाही. (१७)

**सुदस्सं वज्जमञ्ञेसं अत्तनो पन दुद्दसं।**
**परेसं हि सो वज्जानि ओपुणाति यथाभुसं।**
**अत्तनो पन छादेति कलिं' व कितवा सठो ॥१८॥**

इतरांचे दोष पहाणे सहज, स्वत:चे मात्र कठीण,
दुसऱ्यांच्या दोषांना (मानव) भुशा सारखे उडवतो,
स्वत:चे दोष असे झाकतो जसे ठग स्वत:चा पराजय. (१८)

**परवज्जानुपस्सिस्स निच्चं उज्झानसञ्ञिनो।**
**आसवा तस्स वड्ढंति आरा सो आसवक्खया ॥१९॥**

(जो) दुसऱ्याचे दोष पहाणारा, कायम तक्रार करणारा,
त्याचे दुर्विचार वाढतात, (त्याच्या) दुर्विचारांचा क्षय होत नाही. (१९)

**आकासे च पदं नत्थि समणो नत्थि बाहिरे।**
**पपञ्चाभिरता पजा निप्पपञ्चा तथागता ॥२०॥**

आकाशात चिन्ह नाही, (बुद्ध जीवन मार्गा)बाहेर (विना)श्रमण नाही,
सामान्यजन प्रपंचात मग्न असतातत, तथागत प्रपंचहीन आहेत. (२०)

**आकासे च पदं नत्थि समणो नत्थि बाहिरे।**
**सङ्खारा सस्सता नत्थि बुद्धानमिञ्जितं ॥२१॥**

आकाशात चिन्ह नाही, (बुद्ध जीवन मार्गा)बाहेर (विना)श्रमण नाही,
संस्कार (भौतिकता) शाश्वत नाही, बुद्धांमधे (संस्कार) औत्सुक्य नाही. (२१)

**न तेन होति धमट्टो येनत्थं साहसा नये।**
**योच अत्थं अनत्थञ्च उभो निच्छेय्य पण्डितो ॥१॥**

ती न्यायी होत नाही, ज्याकडुन अर्थाची मनमानी होते,
ज्ञानी (मानव) अर्थ-अनर्थ दाहोंची निश्चिती करतो. (१)

**असाहसेन धम्मेन समेन नयति परे।**
**धम्मस्स गुत्तो मेधावी धम्मट्ठो ति पवुच्चति ॥2॥**

जो मनमानी न करता, पक्षपात न करता, न्यायाचे मार्गदर्शन करतो,
सदाचाराचे रक्षण करतो, त्यालाच प्रज्ञावान, न्यायी म्हटले जाते. (२)

**न तेन पण्डितो होति यावता बहु भासति।**
**खेमि अवेरि अभयो पण्डितो'ति पवुच्चति ॥3॥**

जो खुप बोलतो, तो ज्ञानी असत नाही,
क्षमाशील, अवैरी (सर्वमित्र), निर्भय असा (मानव) ज्ञानी म्हटला जातो. (३)

**न तावता धम्मधरो यावता बहु भासति।**
**यो च अप्पम्पि सुत्वान धम्मं कायेन पस्सति।**
**स वे धम्मधरो होति यो धम्मं नप्पमज्जति ॥४॥**

जोवर (मनव फक्त) खुप बोलतो, तोवर तो सदाचारी (धम्मधर) होत नाही,
जो थोड ऐकुन त्यानुसार शरीराने (सवथिाने) आचरण करतो,
जो आचरणात बेपर्वा नसतो, तोच सदाचारी (धम्मधर) असतो.

**न तेन थेरो होति येन'स्स पलितं सिरो।**
**परिपक्को वयो तस्स मोघजिण्णो ति वुच्चति ॥५॥**

डोक्यावरील केस पांढरे झाल्याने कोणी थोर होत नाही,
(फक्त) त्याचे वय परिपक्व होते, तो व्यर्थच म्हातारा म्हणविला जातो. (५)

**यम्हि सच्चञ्च धम्मो च अहिंसा संञ्ञमो दमो ।**
**स वे वन्तमलो धीरो थेरो ति पवुच्चति ॥६॥**

ज्यात सत्यगुण, अहिंसा-गुण, संयम, धीर असतो,
तो निर्मळ, बुद्धीमान (मानव) थोर म्हणविला जोतो. (६)

**न वाक्करणमत्तेन वण्णपोक्खरताय वा ।**
**साधुरूपो नरो होति इस्सुकी मच्छरी सठो ॥७॥**

बोल-चाल चांगली असण्याने, कमळाचा वर्ण (सौंदर्य) असण्याने,
ईर्ष्यावान, मत्सरी, शठ मानव सगुणसंपन्न (साधु) होत नाही. (७)

**यस्स चेतं समुच्छिन्नं मूळघच्चं समूहतं ।**
**स वन्तदोसो मेधावी साधुरूपो ति वुच्चति ॥८॥**

या (इर्ष्या-मत्सर) भावनेचे संपुर्णपणे, मुळासकट उच्चाटन करतो,
तो दोषहीन, प्रज्ञावान (मानव) सगुणसंपन्न (साधु) म्हणविला जोतो. (८)

**न मुण्डकेन समणो अब्बतो अलिकं भणं ।**
**इच्छालोभसमापन्नो समणो किं भाविस्सति ॥९॥**

व्रतस्थ नसलेला, अयोग्य बोलणारा, मुण्डन केल्याने श्रमण होत नाही,
इच्छा, लोभाने भारलेला श्रमण कसा होइल ? (९)

**यो च समेति पापानि अणु थूळानि सब्बसो ।**
**समितत्ता हि पापानं समणो'ति पवुच्चति ॥१०॥**

जो लहान मोठ्या सर्व दुष्कर्मांचे निवारण करतो,
तो दुष्कर्म निवारण्याने श्रमण म्हणविला जातो. (१०)

**न तेन भिक्खु (सो) होति यावता भिक्खते परे ।**
**विस्सं धम्मं समादय भिक्खु होति न तावता ॥११॥**

तोपर्यंत (केवळ) भिक मागतो म्हणुन भिक्खु होत नाही,
जोपर्यंत (तो) त्याज्य गुणांचा अंगिकार करतो, भिक्खु होत नाही. (११)

**यो'ध पुञ्ञञ्च पापञ्च बहित्वा ब्रह्मचरियवा।**
**सङ्खाय लोके चरति स वे भिक्खू'ति वुच्चति ॥१२॥**

जो पाप-पुण्याच्या (सीमे)पार आहे, ब्रह्मचारी आहे,
जो विचारपुर्वक आचरण करतो, तो भिक्खु म्हणविला जातो. (१२)

**न मोनेन मुनी होति मूळ्हरूपो अविद्दसु।**
**यो च तुलं' व पग्गह्य वरमादाय पण्डितो ॥१३॥**

(फक्त) मौन पालनाने मुर्ख, अज्ञानी (मानव) मुनी (मनन करणारा) होत नाही,
जो तराजु धारण केल्याप्रमाणे उत्तमाचे ग्रहण करतो, तो ज्ञानी. (१३)

**पापानि परिवज्जेति स मुनी तेन सो मुनि।**
**यो मुनाति उभो लोके मुनी तेन पवुच्चति ॥१४॥**

मनन करुन जो दष्कृत्याचा त्याग करतो तो मुनि,
दोन्ही लोकांबद्दल मनन करुन (आचरतो) त्याला मुनि म्हटले जाते. (१४)

**न तेन अरियो होति येन पाणानि हिंसति।**
**अहिंसा सब्बपाणानं अरियो'ति पवुच्चति ॥१५॥**

प्रण्यांना मारतो तो सज्जन होत नाही,
सर्व प्राण्यांशी अहिंसेने (वागतो) त्याला सज्जन म्हटले जाते. (१५)

**न सीलब्बतमत्तेन बाहुसच्चेन वा पुन।**
**अथवा समाधिलाभेन विविच्चसयनेन वा ॥१६॥**

शीलवान होउन, व्रतस्थ होउन, खुप (सदुपदेश) ऐकुन,
किंवा एकाग्रचित्त होउन, वेगळे (एकान्त) राहुन, ....

**फुसामि नेक्खम्मसुखं अपुथुज्जनसेवितं।**
**भिक्खु! विस्सासंनापादि अप्पतो आसवक्खयं ॥१७॥**

संसारत्यागाचे सुख, असामान्य जनांची सेवा मी स्पर्शीली (अनुभविली)
(असे समजुन) हे भिक्खु ! चित्त-मल-क्षय होइतो विश्वस्त होउ नका. (१७)

**मग्गानट्ठङिगको सेट्ठो सच्चानं चतुरो पदा।**
**विरागो सेट्ठो धम्मानं द्विपदानञ्च चक्खुमा ॥१॥**

मार्गांत अष्टांग मार्ग श्रेष्ठ, सत्यात चार वचन (आर्यसत्य),
सिद्धांतात विराग (निर्वाण) श्रेष्ठ, द्विपादांत (मानवांत) दृष्टीवंत (बुद्ध). (१)

**एसो'व मग्गो नत्थञ्ञो दस्सनस्स विसुद्धिया।**
**एतं हि तुम्हे पटिपज्जथ मारस्सेतं पमोहनं ॥2॥**

विशुद्धीच्या दर्शनाचा (पावित्र्य प्राप्तिचा) हा एकच मार्ग आहे, दुसरा नाही,
तुम्ही याच मार्गावर चला, हा (मार्ग) भुल-भलैयालाच भुलवितो. (२)

**एतं हि तुम्हेहि पटिपन्ना दुक्खस्सन्तं करिस्सथ।**
**अक्खातो वे मया मग्गो अञ्ञाय सल्लसन्थनं ॥3॥**

या मार्गानेच तुम्ही दुक्खाचा अंत करु शकाल,
हा मार्ग मी (स्वत:) बाणाचे शल्य (वेदनेचे कारण) समजुन सांगीतला आहे. (३)

**तुम्हेहि किच्चं आतप्पं अक्खतारो तथागता।**
**पटिपन्ना पमोक्खन्ति झायिनो मारबन्धना ॥४॥**

तुम्हालाच प्रयत्न करायचा आहे, तथागत मार्गदर्शक आहेत,
या मार्गाक्रमणाने, एकाग्र होउन (तुम्ही) भुलैयाच्या बंधनातुन मुक्त व्हाल. (४)

**सब्बे सङखारा अनिच्चा'ति यदा पञ्ञय पस्सति।**
**अथ निब्बिन्दन्ति दुक्खे, एसमग्गो विसुद्धिया ॥५॥**

सर्व संस्कार (भौतिकता) अनित्य (नाशवंत) आहेत, हे जेंव्हा प्रज्ञेने पहातो,
तेंव्हा दुक्खाची अवहेलना (समाप्ति) होते, हाच विशुद्धीचा मार्ग आहे. (५)

**सब्बे सङखारा दुक्खा'ति यदा पञ्ञय पस्सति।**
**अथ निब्बिन्दन्ति दुक्खे, एसमग्गो विसुद्धिया ॥६॥**

सर्व संस्कार (भौतिकता) दुक्खद आहेत, हे जेंव्हा प्रज्ञेने पहातो,
तेंव्हा दुक्खाची अवहेलना (समाप्ति) होते, हाच विशुद्धीचा मार्ग आहे. (६)

**सब्बे धम्मा अनत्ता'ति यदा पञ्ञय पस्सति।**
**अथ निब्बिन्दन्ति दुक्खे, एसमग्गो विसुद्धिया ॥७॥**

सर्व गुण-स्वभाव अनित्य (नाशवंत) आहेत, हे जेंव्हा प्रज्ञेने पहातो,
तेंव्हा दुक्खाची अवहेलना (समाप्ति) होते, हाच विशुद्धीचा मार्ग आहे. (७)

**उट्ठानकालम्हि अनुट्ठहानो युवा बलि आलसियंउपेतो।**
**संसन्नसङ्कप्पमनो कुसितो पञ्ञाय मग्गं अलसो न विदन्ति ॥८॥**

उठण्याच्या वेळीही जो उठत नाही, तरुण, बलवान असुनही आळसावलेला असतो,
मनातले सुसंकल्प आळसाने दवडतो, अशा आळशी (मानवाला)
प्रज्ञामार्ग प्राप्त होत नाही. (८)

**वाचानुरक्खी मनसा सुसंवतो कायेन च अकुसलं न कयिरा।**
**एते तयो कम्मपथे विसोधये आराधये मग्गमिसिप्पवेदितं ॥९॥**

वाणीचे रक्षण करतो, मन संयमित ठेवतो, शरीराने अयोग्य (कृत्य) करीत नाही,
असे या तीहींना (तीन इंद्रीयांना) कर्म-मार्गावर शुद्ध ठेवतो,
तोच श्रेष्ठजनांनी सांगीतलेला मार्ग प्रसन्न (प्राप्त) करतो. (९)

**योगा वे जायती भूरि अयोगा भूरिसङ्खयो।**
**एतं द्वेधा पथं भवाय विभवाय च।**
**तथ'त्तानं निवेसेय्य यथा भूरि पवड्ढति ॥१०॥**

अभ्यासाने प्रज्ञा उत्पन्न होते, अनाभ्यासाने प्रज्ञेची हानी होते,
उत्पत्ति व विनाशाच्या या दोहींची जाणीव ठेवुन,
तसे स्वतःला स्थापित केल्याने (स्व)प्रज्ञेची वृद्धी होते. (१०)

**वनं* छिन्दथ मा रुक्खं वनतो* जायती भयं।**
**छेत्वा वनञ्च वनथञ्च* निब्बना होथ भिक्खवो ॥११॥**

(तृष्णेला) जंगल तोडा, वृक्ष तोडु नका, जंगलाने (तृष्णेने) भय उत्पन्न होते,
हे भिक्खुंनो ! (तृष्णेची) जंगल-झुडुपे तोडुन तृष्णाहीन व्हा. (११)

* वनय - तृष्णा / वन - जंगल / वनथ - झुडुप
या ११व्या व पुढील १२व्या सुत्तात आलेला 'वन' आणि 'वनथ' हा शब्द 'वनय' या शब्दा ऐवजी आला असावा असे प्रकर्षाने जाणवते. किंवा येथे हे शब्द 'जंगल' या अर्थाने नसुन 'तृष्णा' याच अर्थाने आले आहेत.

यावं हि वनथो* न छिज्जति अनुमत्तोपि नरस्स नारिसु।
पटिबद्धमनो'व ताव सो वच्छो खीरपको'व मातरि ॥१२॥

जीवर पुरुषाला (असलेली) स्त्रिची तृष्णा अणुमात्रही भेदलेली नाही,
तीवर ती मनाने (स्त्रिशी) बद्ध असती, जसे दुध पिणारे वासरु मातेशी. (१२)

उच्छिन्द सिनेहमत्तनो कुमुदं सारदिकं'व पाणिना।
सन्तिमग्गमेव ब्रूहय निब्बानं सुगतेन देसितं ॥१३॥

शरदात (शरद ऋतुत) कमळ (तोडावे), तसा स्वताचा स्नेह तोडावा, (आणि)
सन्मार्गी गेलेल्याने (बुद्धाने) उपदेशिलेला निर्वाणाचा मार्ग जोडावा. (१३)

इध वस्सं वसिस्सामि इध हेमन्तगिम्हिसु।
इति बालो विचिन्तेति अन्तरायं न बुज्झति ॥१४॥

इथे वर्षा'त (ऋतुत), इथे हेमन्तात, ग्रीष्मात, वास करीन,
असे अजाण (मानव) विचार करतात, (मोहाचे) विघ्न जाणित नाहीत. (१४)

तं पुत्तपसुसम्मतं व्यासत्तमनसं नरं।
सुत्तं गामं महोघो'व मच्चु आदाय गच्छति ॥१५॥

पुत्र, पशु (इत्यादींच्या लोभाच्या) नशेत आसक्त मानवाला,
झोपलेल्या गावाला (नदीच्या) पुराने (घेउन जावे) तसे मृत्यू घेवुन जातो. (१५)

न सन्ति पुत्ता ताणाय न पिता नापि बान्धवा।
अन्तकेनाधिपन्नस्स नत्थि ञातिसु ताणता ॥१६॥

ना पुत्र, ना पिता, ना बन्धु, (तुमचे) रक्षण करु शकतात,
ना नातेवाइक, जेव्हां मृत्यु (तुम्हास) गृहीत धरतो ... (१६)

एतमत्थवसं ञत्वा पण्डितो सीलसंवुतो।
निब्बानगमनं मग्गं खिप्पमेव विसोधये ॥१७॥

या अर्थाचा प्रभाव जाणुन शीलवान, ज्ञानी (मानवां)नी,
निर्वाणाकडे जाणारा मार्ग त्वरीत शोधावा. (१७)

**मत्तासुखपरिच्चांगा पस्से चे विपुलं सुखं ।**
**चजे मत्तासुखं धीरो सम्पस्सं विपुलं सुखं ॥१॥**

सीमीत सुखाच्या त्यागाने जर खुप सुखप्राप्ति दिसत असेल,
तर विद्वान (मानवाने) सीमीत सुख त्यागुन विपुल सुखाकडे पहावे. (१)

**परदुक्खूपदानेन यो अत्तनो सुखमिच्छति ।**
**वेरसंसग्गसंसट्ठो वेरा सो न परिमुच्चति ॥2॥**

दुसऱ्याला दुक्ख देवुन जो स्वताचे सुख इच्छितो,
शत्रुत्वसंपर्कातील अशा (मानवा)ची शत्रुत्वापासुन मुक्ति होत नाही. (२)

**यं हि किच्चं तदपविद्धं अकिच्चं मन कयिरति ।**
**उन्नलानं पमत्तानं तेसं वड्ढन्ति आसवा ॥3॥**

जे कर्तव्य आहे त्याचा अव्हेर करुन जे अकर्तव्य ते मनाने करतो,
त्या अहंकारी, प्रमादी (मानवाचे) चित्तविकार वाढतात. (३)

**येसञ्च सुसमारद्धा निच्चं कायगता सति ।**
**अकिच्चं ते न सेवन्ति किच्चे सातच्चकारिनो ।**
**सतानं सम्पजानानं अत्थं गच्छन्ति आसवा ॥४॥**

ज्यांची शारीरी-जागृकता नित्य मंगलारंभी (सदैव तत्पर) असते,
जे अकृत्य करीत नाहीत, कृत्य ते सातत्याने करतात,
त्या चेतन, कार्यमग्न (मानवाचे) चित्तविकार विनाशाकडे जातात. (४)

**मातरं पितरं हन्त्वा राजानो द्वे च खत्तिये ।**
**रट्ठं सानुचरं हन्त्वा अनीघो याति ब्राह्मणो ॥५॥**

माता (तृष्णा), पिता (अहंकार), दोन क्षत्रिय राजांचा (आत्मदृष्टी-उच्छेददृष्टी) वध करुन, त्यांच्या अनुयायासह राज्याचा (अहंकार व तृष्णेसोबत येणाऱ्या सर्व चित्तविकारांचा) संहार करुन (ब्राह्मण) सुजन दुक्खविहीन होतो. (५)

मातरं पितरं हन्त्वा राजानो द्वे च सोत्थिये।
वेय्यग्घपञ्चमं हन्त्वा अनीघो याति ब्राह्मणो ॥६॥

माता (तृष्णा), पिता (अहंकार), दोन क्षत्रिय राजांचा (आत्मदृष्टी-उच्छेददृष्टी) वध करुन, पाच व्याघ्रचर्म अच्छादने (ज्ञानाची पाच आवरणे) नष्ट करुन, (ब्राह्मण) सुजन दुक्खविहीन होतो. (६)

सुप्पबुद्धं पुबुज्झन्ति सदा गोतमसावका।
येसं दिवा च रत्तो च निच्चं बुद्धगता सति ॥७॥

(त्या) गौतम-शिष्यांची तीक्ष्णबुद्धि सदैव जागृत असते,
ज्यांची स्मृती रात्रौ-दिवस नित्य बुद्धांकडे जात असते. (७)

सुप्पबुद्धं पुबुज्झन्ति सदा गोतमसावका।
येसं दिवा च रत्तो च निच्चं धम्मगता सति ॥८॥

(त्या) गौतम-शिष्यांची तीक्ष्णबुद्धि सदैव जागृत असते,
ज्यांची स्मृती रात्रौ-दिवस नित्य धम्माकडे जात असते. (८)

सुप्पबुद्धं पुबुज्झन्ति सदा गोतमसावका।
येसं दिवा च रत्तो च निच्चं सङ्घगता सति ॥९॥

(त्या) गौतम-शिष्यांची तीक्ष्णबुद्धि सदैव जागृत असते,
ज्यांची स्मृती रात्रौ-दिवस नित्य संघाकडे जात असते. (९)

सुप्पबुद्धं पुबुज्झन्ति सदा गोतमसावका।
येसं दिवा च रत्तो च निच्चं कायगता सति ॥१०॥

(त्या) गौतम-शिष्यांची तीक्ष्णबुद्धि सदैव जागृत असते,
ज्यांची स्मृती रात्रौ-दिवस नित्य शरीराकडे (शरीराचे भान) जात असते. (१०)

सुप्पबुद्धं पुबुज्झन्ति सदा गोतमसावका।
येसं दिवा च रत्तो च निच्चं अहिंसाय रतो मनो ॥११॥

(त्या) गौतम-शिष्यांची तीक्ष्णबुद्धि सदैव जागृत असते,
जे रात्रौ-दिवस नित्य मन:पुर्वक अहिंसेत मग्न असतात. (११)

सुप्पबुद्धं पुबुज्झन्ति सदा गोतमसावका।
येसं दिवा च रत्तो च निच्चं भावनाय रतो मनो ॥१२॥

(त्या) गौतम-शिष्यांची तीक्ष्णबुद्धि सदैव जागृत असते,
जे रात्रौ-दिवस नित्य मनोभावनेत (मनाच्या सद्भावनेत) मग्न असतात. (१२)

दुप्पब्बज्जं दुरभिरमं दुरावास घरा दुखा।
दुक्खोसमनासंवासो दुक्खानुपतितद्धगू।
तस्मा न च अद्धगू सिया न च दुक्खानुपतितो सिया ॥१३॥

प्रवज्जित असणे दुष्कर, भोगात रहाणे दुष्कर, गृहस्थ घरी रहाणे दुक्खकर,
असमान (लोकांत) रहाणे दुक्खकर, अवागमनात पडणे दुक्खकर,
म्हणुन अवागमनात पडु नये, दुक्खात पडु नये. (१३)

सद्धो सीलेन सम्पन्नो यसोभोगसमप्पितो।
यं यं पदेसं भजति तत्थ तत्थेव पूजितो ॥१४॥

जो श्रद्धा व शीलाने संपन्न असतो, यश व संपत्तिचे समर्पण करतो,
तो ज्या ज्या स्थानी जातो, तेथे तेथे पुजला जातो. (१४)

दुरे सन्तो पकोसेन्ति हिमवन्तोव पब्बता।
असन्तेतत्थ न दिस्सन्ति रत्तिखित्ता यथा सरा ॥१५॥

सत्पुरुष बर्फाच्छादित पर्वतासारखे दुरुनही प्रकाशित असतात,
असत्पुरुष रात्री (अंधारात) फेकलेल्या बाणासारखे, दिसत नाहीत. (१५)

एकासनं एकसेय्यं एकोचरमतन्दितो।
एकोदमयत्तानं वनन्ते रमितो सिया ॥१६॥

एक आसनी, एक शैयी, न थकता एकटा रहाणारा,
स्वताचे एकटयाने संयमन करणारा, वनात रममाण असतो. (१६)

**अभुतवादी निरयं उपेति यो चापि कत्वा 'न करोमी' ति चाह।**
**उभोपि ते पेच्च समा भवन्ति निहीनकम्मा मनुजा परत्थ ॥१॥**

असत्य बोलणारे नरकात जातात, (दुष्कृत्य)करुनही 'न केले' असे सांगणारे सुद्धा,
मृत्योपरांत दोघेही सारखेच होतात, दुष्कृत्य करणारे परलोकात (सारखेच). (१)

**कासावकण्ठा बहवो पापधम्मा असञ्ञता।**
**पापा पापेहि कम्मेहि निरयन्ते उप्पज्जरे ॥2॥**

भगवे(वस्त्र) गळ्यात घालणारे अनेक लोक, जे दुर्गुणी, असंयमी (आहेत),
ते त्यांच्या दुष्कृत्याने नरकात उत्पन्न होतात. (२)

**सेय्यो अयोगुळो भुत्तो तत्तो अग्गिसिखूपमो।**
**यञ्चो भुञ्जेय्य दुस्सीलो रट्ठपिण्डं असञ्ञतो ॥3॥**

अग्नि-ज्वाळां सारखा तप्त लोह-गोळा खाणे चांगले,
शीलभ्रष्ठ व असमंयमी होउन राष्ट्राचे (लोकांचे) अन्न खाणे याहुन.(३)

**चत्तारी ठानानी नरो पमत्तो आपज्जति परदारूपसेवी।**
**अपुञ्ञलाभं न निकामसेय्यं निन्दं ततियं निरय चतुत्थं ॥४॥**

परस्त्रीच्या सोबतीत रहाणाऱ्या परुषाच्या चार स्थिती होतात,
अपुण्यलाभ, ठिक झोप न येणे, तिसरी निन्दा व चौथी नरकवास. (४)

**अप्पुञ्ञलाभो च गती च पापिका भीतस्स भीताय रती च थोकिका।**
**राजाच दण्डं गरुकं पणेति तस्मा नरो परदारं न सेवे ॥५॥**

अपुण्यलाभ, दुर्गती, भयग्रस्ताची भयभीतेशी थोडीसीच रतिक्रिडा,
राजाकडुन कठोर सजा होते, म्हणुन माणसाने परस्त्री भोग करु नये. (५)

**कुसो यथा दुग्गहीतो हत्थमेवानुकन्तति।**
**सामञ्ञं दुप्परामट्ठं निरयायुपकड्ढति ॥६॥**

गवताची पाती नीट न धरल्यास हाताला जखमी करतात,
तसेच श्रामण्याचे नीट पालन न केल्यास, ते (मनवाला) नरकात ढकलते. (६)

यं किञ्चि सिथिलं कम्म सङ्किलिट्ठं च यं वतं।
सङ्कस्सरं ब्रह्मचरियं न तं होति महप्फलं ॥७॥

शिथील पणे केलेले काहींही कार्य, मलिनपणे केलेले व्रत,
सशंक ब्रह्मचर्या, यांचे फलित मोठे असत नाही. (७)

कयिरा कयिराथेन दळ्हमेतं परक्कमे।
सिथिलो हि परिब्बाजो भिय्यो आकिरते रजं ॥८॥

जे करायचे असेल ते दृढ पराक्रमाने करावे,
शिथील पणाने प्रवज्जा (पाळणारा) अत्याधिक धुळ उडवितो. (८)

अकतं दुक्कतं सेय्यो पच्छा तपति दुक्कतं।
कतञ्च सुकतं सेय्यो यं कत्वा नानुतप्पति ॥९॥

दुष्कृत्य न करणे चांगले, दुष्कृत्याने पश्चाताप होतो,
सत्कृत्य करणे चांगले, असे केल्याने पश्चाताप होत नाही. (९)

नगरं यथा पच्चन्तं गुत्तं सन्तरबाहिरं।
एवं गोपेथ अत्तानं खणो वे मा उपच्चगा।
खणातीता हि सोचन्ति निरयम्हि समप्पिता ॥१०॥

जसे नगर आतुन बाहेरुन संरक्षित असते,
तसे स्वत:ला सुरक्षित ठेवावे, क्षणभरही निसटु नये,
क्षणभराच्या जाण्याने (निसटण्याने) नरकात समर्पण होते. (१०)

अलज्जिताये लज्जन्ति लज्जिताये न लज्जरे।
मिच्छादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति दुग्गति ॥११॥

लाज वाटु नये तेथे लाज वाटते पण लाजिरवाण्या (कामात) लाज वाटत नाही,
अशी खोटी समजुत बाळगणारे लोक दुर्गतीला जातात. (११)

अभये च भयदस्सिनो भयेच अभयदस्सिनो
मिच्छादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति दुग्गति ॥१२॥

भीती वाटु नये तिथे भितात पण भिती वाटावी तिथे भित नाहीत,
अशी खोटी समजुत बाळगणारे लोक दुर्गतीला जातात. (१२)

अवज्जे वज्जमतिनो वज्जे चावज्जदस्सिनो
मिच्छादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति दुग्गति ॥१3॥

अवर्ज्य ते वर्ज्य मानतात पण वर्ज्य ते अवर्ज्य मानित नाहीत,
अशी खोटी समजुत बाळगणारे लोक दुर्गतीला जातात. (१३)

वज्जञ्च वज्जतो ञत्वा अवज्जञ्च अवज्जतो ।
सम्मादिट्ठिसमादाना सत्ता गच्छन्ति सुग्गतिं ॥१४॥

वर्ज्य ते वर्ज्य समजतात, अवर्ज्य ते अवर्ज्य,
अशी सम्यक दृष्टी बाळगणारे लोक सुगति प्राप्त करतात. (१४)

**अहं नागो'व सङ्गामे चापतो पतितं सरं।**
**अतिवाक्यं तितिक्खिस्सं दुस्सीलो हि बहुज्जनो ॥१॥**

युद्धात जसे हत्ती धनुष्यातुन सुटलेल्या बाणांना सहन करतो,
तसेच मी अपशब्द (सहन करीन), (कारण) जगात खुप दुर्जन आहेत. (१)

**दन्तं नयन्ति समितिं दन्तं राजाभिरूहति।**
**दन्तो सेट्ठो मनुस्सेसु योतिवाक्यं तितिक्खति ॥2॥**

संयमित (हत्तीस) परिषदेत (मेळाव्यात) नेतात, संयमितावर (हत्तीवर) राजा स्वार होतो, संयमित मानव श्रेष्ठ आहे, तो अपशब्द सहन करतो. (२)

**वरा अस्सतरा दन्ता आजानीया च सिन्धवा।**
**कुञ्जरा च महानागा अत्तदन्ता ततो वरं ॥3॥**

संयमित खेचर, चांगल्या प्रतीचा सिन्धी घोडा, श्रेष्ठ आहे, ....
महानाग हत्ति, तसेच स्व-संयमित (मानव) श्रेष्ठ आहे. (३)

**नहि एतेहि यानेहि गच्छेय्य अगतं दिसं।**
**यथाऽत्तना सुदन्तेन दन्तो दन्तेन गच्छति ॥४॥**

या वाहनांनी (खेचर, घोडा) न गेलेल्या दिवसाकडे (भविष्याकडे) जाता येत नाही,
जसे स्वयं-सुसंयमित (मानव) संयमामुळे (भविष्याकडे) जातो. (४)

**धनपालको नाम कुञ्जरो कटुकप्पभेदनो दुन्निवारयो।**
**बद्धो कवळं न भुञ्जति सुमरति नागवनस्स कुञ्जरो ॥५॥**

धनपालक नावाचा हत्ति, तीक्ष्णतेला (अंकुश) तोडणारा, रोखण्यास कठीण असा,
बंधनात असताना कांही न खाता हत्ति-वनातल्या हत्तिंना आठवीत रहातो. (५)

**मिद्धी यदा होति महग्घसो च निद्दायिता सम्परिवत्तसायी।**
**महावराहो'व निवापपुट्ठो पुनप्पुनं गब्भमुपेति मन्दो ॥६॥**

(माणुस) जेंव्हा आळशी, खादाड, लोळत झोपणारा असा होतो, चारा खाउन
माजलेल्या डुकरा सारखा सुस्तावलेला, (तेंव्हा तो) पुन्हा-पुन्हा गर्भात पडतो. (६)

**इदं पुरे चित्तमचारि चारिकं येनिच्छकं यत्थकामं यथासुखं।
तदज्ज'हं निग्गहेस्सामि योनिसो हत्थप्पभिन्नं विय अंकुसग्गहो ॥७॥**

या पुर्वी चित्त त्याच्या इच्छेने, जशी कामना असेल, जसे सुख वाटेल, तसे विहरले,
आजपासुन मी निग्रहाने यथार्थ ठेवीन, हत्तिस अंकुशधारी (ठेवतो) तत्सम. (७)

**अप्पमादरता होथ स'चित्तमनुरक्खथ।
दुग्गा उद्धरथ-त्तानं पङ्के सत्तोव कुञ्जरो ॥८॥**

अप्रमादात रममाण होउन स्व चित्ताचे रक्षण करावे,
चिखलात रुतलेला हत्ति (वर काढतो तसे) स्वताला कठीण मार्गातुन वर न्यावे.(८)

**सचे लभेथ निपकं सहाएं सद्धिं चरं साधुविहारि धीरं।
अभिभुय्य सब्बानि परिस्सयानि चरेय्य तेन'त्तमनो सतीमा ॥९॥**

जर दक्ष, बुद्धिमान, चांगला, मित्र लाभला, तर ....
सर्व विघ्नांवर मात करुन प्रसन्न चित्ताने त्याच्या सोबत रहावे. (९)

**नो च लभेथ निपकं सहायं सद्धिं चरं साधुविहारि धीरं।
राजा'व रट्ठं विजितं पहाय एको चरे मातङ्ग'रञ्ञेव नागो ॥१०॥**

जर दक्ष, बुद्धिमान, चांगला, मित्र लाभला नाही, तर (एकटे रहावे),
जसे 'मातङ्ग' राजा हत्ति, पराजित राष्ट्र सोडुन एकटा अरण्यात रहातो. (१०)

**एकस्स चरितं सेय्यो नत्थि बाले सहायता।
एको चरे न च पापानि कयिरा,अप्पोसुक्को मातङ्ग'रञ्ञेव नागो ॥११॥**

अज्ञानी (मानवा)ची मैत्री करु नये (त्यापेक्षा) एकटे रहाणे चांगले,
एकटे रहावे, दुष्कृत्य करु नये, अनासक्त, 'मातङ्ग' राजा हत्ति सारखे. (११)

**अत्थम्हि जातम्हि सुखा सहाया, तुट्ठी सुखा या इतरीतरेन।
पुञ्ञ सुखं जीवितसङ्खयम्हि सब्बस्स दुक्खस्स सुखं पहाणं ॥१2॥**

गरज असेल तेंव्हा मित्र सुखावह, या-त्या (कारणा)ने संतुष्ट असणे सुखावह,
जीवन अंतसमयी सत्कृत्य सुखावह, (या सर्वाहुन) दुक्ख-विनाश सुखावह. (१२)

**सुखा मत्तेय्यता लोके अथो पेत्तेय्यत्ता सुखा।**
**सुखा सामञ्ञता लोके अथो ब्रह्मञ्ञता सुखा ॥१३॥**

जनात मातृसेवा सुखावह आणि पितृसेवा सुखावह,
जनात श्रमणत्व सुखावह, आणि परमश्रेष्ठजीवन सुखावह. (१३)

**सुखं याव जरा सीलं सुखा सद्धा पतिट्ठिता।**
**सुखो पञ्ञाय पटिलाभो पापानं अकरणं सुखं ॥१४॥**

वृद्धत्वा पर्यंत शील सुखावह, स्थापित श्रद्धा सुखावह,
प्रज्ञेची प्राप्ति सुखावह, (या सर्वाहुन) दुष्कृत्य न करणे सुखावह. (१४)

**मनुजस्स पमत्तचारिनो तण्हा वड्ढति मालुवा विय।**
**सो प्लवती हुराहुरं फलमिच्छं व वनस्मि वानरो ॥१॥**

प्रमादी माणसाची तृष्णा आकाश-वेली सारखी वाढते,
ती लोक-लोकात उड्या मारीत रहाती, जसे फळाच्या इच्छेने वनातले वानर. (१)

**यं एसा सहति जम्मि तण्हा लोके विसत्तिका।**
**सोका तस्स पवड्ढन्ति अभिवट्ठंव बीरणं ॥2॥**

ही निम्नतल, विषारी तृष्णा ज्याला जिंकुन घेते,
त्याची दुक्खे पावसाळ्यातल्या 'बीरण' गवतासम वाढतात. (२)

**यो चेतं सहति जम्मि तण्हा लोके दुरच्चयं।**
**सोका तम्हा पपतन्ति उदबिन्दुव पोक्खरा ॥3॥**

जो या निम्नतल, दुर्लंघ्य तृष्णेला जिंकुन घेतो,
त्याचे शोक (गळुन) पडतात, जसे कमळावर (पडलेले) जलबिंदु. (३)

**तं वो वदामि भद्दं वो यावन्तेत्थ समागता।**
**तण्हाय मूलं खणथ उसीरत्थोव बीरणं।**
**मा वो नळं व सोतोव मारो भञ्जि पुनप्पुनं ॥४॥**

इथे आलेल्या तुम्हा सर्वांना मंगल सांगतो,
तृष्णेचे मुळ खणुन काढा, 'खस' च्या अपेक्षेने 'बीरण' खणुन (काढावे तसे),
(त्याने) भुलैया पुन्हा-पुन्हा हानी करणार नाही, जसे पुर कळकीची (करतो). (४)

**यथापि मूले अनुपद्दवे दळ्हे छिन्नोपि रुक्खो पुनरेव रूहति।**
**एवम्पि तण्हानुसये अनूहते निब्बत्तति दुक्खमिदं पुनप्पुनं ॥५॥**

जर मुळे इजाहीन व दृढ असतील, तोडलेला वृक्षही पुन्हा उगवतो,
तसे तृष्णेची वृत्ती समुळ खणली नाही तोवर दुक्ख पुन्हा पुन्हा उत्पन्न होतात. (५)

**यस्स छत्तिंसति सोता मनापस्सवना भुसा।**
**बाहा वहन्ति दुद्दिट्ठिं सङ्कप्पा रागनिस्सिता ॥६॥**

ज्याचे छत्तिस स्त्रोत अधिक मन-प्रसवित (मनासारखे) असतात,
त्या दु-दृष्टीच्या (मानवा)चे संकल्प आसक्ति आश्रित होतात. (६)

**सवन्ति सब्बधि सोता लता उब्भिज्ज तिट्ठति।**
**तञ्च दिस्वा लतं जातं मूलं पञ्ञाय छिन्दथ ॥७॥**

सारे स्त्रोत वहातात, (तृष्णारुपी) वेल अंकुरीत होत रहाते,
(म्हणुन) ती वेल उगवताना दिसताच, प्रज्ञेने (तीची) मुळे कापावीत. (७)

**सरितानि सिनेहितानि च सोमनस्सानि भवन्ति जन्तुनो।**
**ते सोतसिता सुखेसिनो ते वे जातिजरुपगा नरा ॥८॥**

स्नेहरुपी नद्या प्राण्यांना प्रसन्न वाटतात,
स्त्रोतासक्त सुखाचा वेध घेतात आणि ते मानव जन्म-वार्धक्य-मृत्यूत गुंततात.(८)

**तसिणाय पुरक्खता पजा परिसप्पन्ति ससो'व बाधितो।**
**सञ्ञोजनसङ्गसत्तका दुक्खमुपेन्ति पुनप्पुन चिराय ॥९॥**

तृष्णेने पुरस्कृत जन, बांधलेल्या सशासारखे (तृष्णेभोवती) घोटाळत रहातात,
आसक्तिने बांधलेले (मानव) चिरकाल पुन्हा पुन्हा दुक्खाकडेच येतात. (९)

**तसिणाय पुरक्खता पजा परिसप्पन्ति ससो'व बाधितो।**
**तस्मा तसिणं विनोदये भिक्खु आकङ्खी विरागमत्तनो ॥१०॥**

तृष्णेने पुरस्कृत जन, बांधलेल्या सशासारखे (तृष्णेभोवती) घोटाळत रहातात,
म्हणून वैराग्याची आकांक्षा असलेल्या भिक्खुने तृष्णेला दूर करावे. (१०)

**यो निब्बनथो वनाधिमुत्तो वनमुत्तो वनमेव धावति।**
**तं पुग्गलमेव पस्सथ मुत्तो बन्धमेव धावति ॥११॥**

जो निवाणार्थी, वनस्थ-संकल्पि, तृष्णामुक्त होतो, (व पुन्हा) तृष्णेकडे धावतो,
असा व्यक्ति म्हणजे (बंधन)मुक्त होउन, (पुन्हा) बंधनाकडे धावणारा. (११)

**न तं दळ्हं बन्धनमाहु धीरा यदायसं दारुजं बब्बजञ्च ।**
**सारत्तरत्ता मणिकुण्डलेसु पुत्तेसु दारेसु च या अपेक्खा ॥१२॥**

या लोहाच्या, लाकडाच्या, दोराच्या बंधनांना ज्ञानीजन दृढ(बंधन) मानीत नाहीत,
माणकांच्या कुंडलांच्या, पुत्राच्या, स्त्रिच्या आसक्तित रमणे (हे दृढ बंधन).(१२)

**एतं दळ्हं बन्धनमाहु धीरा ओहारिनं सिथिलं दुप्पमुच्चं ।**
**एतम्पि छेत्वान परिब्बजन्ति अनपेक्खिनो कामसुखं पहाय ॥१३॥**

या त्यागण्यास कठीण, बंधनांना ज्ञानी जन पतनोन्मुख, शिथील मानतात,
ही(बंधने) तोडुन, कामसुख त्यागुन, अनपेक्षीत होउन, ते प्रवज्जित होतात. (१३)

**ये रागरत्तानुपतन्ति सोतं सयं कतं मक्कटकोव जालं ।**
**एतम्पि छेत्वान वजन्ति धीरा अनपेक्खिनो सब्बदुक्खं पहाय ॥१४॥**

आसक्तित रममाण होतात ते धारेत पडतात,
जसे कोळी स्वता केलेल्या जाळ्यात (अडकतो).
ही(बंधने) तोडुन, सर्व दुक्ख त्यागुन, अनपेक्षीत होउन,
ज्ञानी जन प्रवज्जित होतात. (१४)

**मुञ्च पुरं मुञ्च पच्छतो मज्झे मुञ्च भवस्स पारगू ।**
**सब्बत्थ विमुत्तमानसो न पुन जातिजरं उपेहिसि ॥ १५॥**

पुर्वी मुक्त, नंतर मुक्त, आता मुक्त होउन भौतिकाच्या पार हो,
सर्व बाजुंनी मनाला मुक्त करणारे 'जन्म-वृद्धत्व-मृत्यू'त पुन्हा येत नाहीत. (१५)

**वितक्कपमथितस्स जन्तुनो तिब्बरागस्स सुभानुपस्सिनो ।**
**भिय्यो तण्हा पवड्ढति एसो खो दळ्हं करोति बन्धनं ॥१६॥**

तर्क-वितर्कात पडलेले, तीव्र आसक्त, (फक्त) शुभ पहाणारे, या जीवांची ....
तृष्णा खुपच वाढते, ते वास्तवात बंधनांना दृढ करतात. (१६)

**वितक्कूपसमे च यो रतो असुभं भावयति सदा सतो ।**
**एस खो व्यन्तिकाहिति एस छेज्जति मारबन्धनं ॥१७॥**

वितर्क शमविण्यात मग्न, जागृत राहुन सदा अशुभ पहाणारे,
असे (मानव) वास्तवात तृष्णा नष्ट करतात, भुलैयाला छेदुन जातात. (१७)

निट्ठङ्गतो असन्तासी विततण्हो अनङ्गणो।
उच्छिज्ज भवसल्लानि अन्तिमो'यं समुस्सयो ॥१८॥

निष्ठेप्रत पोचलेला, निर्भय, तृष्णाहीन, द्वेषहीन, (असा जो)....
भौतिक शल्यांचा उच्छेद करतो, हा त्याचा अंतिम समुच्चय होय. (१८)

वीततण्हो अनादानो निरुत्तिपदकोविदो।
अक्खरानं सन्निपातं जञ्ञा पुब्बपरानि च।
स वे अन्तिमसारीरो महापञ्ञाति'ति वुच्चति ॥१९॥

जो तृष्णाहीन, परिग्रहहीन, भषा-काव्य पंडित,
अक्षरांचा मेळ व त्याचे पुर्व-उत्तर क्रम जाणणारा आहे,
तो मोठा प्रज्ञावान म्हणविला जातो, हे त्याचे अंतिम शरीर आहे. (१९)

सब्बाभिभू सब्बविदूहमस्मि सब्बेसु धम्मेसु अनूपलित्तो।
सब्बञ्जहो तण्हक्खये विमुत्तो सयं अभिञ्ञाय कमुद्दिसेय्यं ॥20॥

मी सर्व-विजयी, सर्व-बुद्धि-युक्त, सर्व-स्वभाव-अलिप्त, सर्व-ज्ञानी, तृष्णा-क्षया मुळे मुक्त, स्वताला योग्य जाणणारा आहे,(तर मी) कोणाचा उद्देश करु ?

सब्बदानं धम्मदानं जिनाति सब्बं रसं धम्मरसो जिनाति।
सब्बं रतिं धम्मरती जिनाति तण्हक्खयो सब्बदुक्खं जिनाति ॥21॥

धम्मदान सर्व दानांना जिंकते, धम्मरस सर्व रसांना जिंकतो,
धम्म-रमण सर्व रमणांना जिंकतो, तृष्णा-क्षय सर्व दुक्खांना जिंकतो. (२१)

हनन्ति भोगा दुम्मेधं नो पारगवेसिनो।
भोगतण्हाय दुम्मेधो हन्ति अञ्ञे'व अत्तनं ॥22॥

विलास दुर्बुद्धाला नष्ट करतात, जर तो पार (जाणे) शोधीत नाही,
विलास-तृष्णेने दुर्बुद्ध, दुसऱ्या सारखे, स्वतालाच नष्ट करतो. (२२)

तिणदोसानि खेत्तानि रागदोसा अयं पजा।
तस्मा हि वीतरागेसु दिन्नं होति महप्फलं ॥23॥

शेताचा दोष गवत, या जनांचा दोष आसक्ति,
म्हणून अनासक्तास दिलेल्याचे (दानाचे) मोठे फळ होते. (२३)

तिणदोसानि खेत्तानि दोसदोसा अयं पजा।
तस्मा हि वीतदोसेसु दिन्नं होति महप्फलं ॥२४॥

शेताचा दोष गवत, या जनांचा दोष द्वेष,
म्हणून द्वेषहीनास दिलेल्याचे (दानाचे) मोठे फळ होते. (२४)

तिणदोसानि खेत्तानि मोहदोसा अयं पजा।
तस्मा हि वीतमोहेसु दिन्नं होति महप्फलं ॥२५॥

शेताचा दोष गवत, या जनांचा दोष मोह,
म्हणून निर्मोहीस दिलेल्याचे (दानाचे) मोठे फळ होते. (२५)

तिणदोसानि खेत्तानि इच्छादोसा अयं पजा।
तस्मा हि विगतिच्छेसु दिन्नं होति महप्फलं ॥२६॥

शेताचा दोष गवत, या जनांचा दोष इच्छा,
म्हणून निरीच्छास दिलेल्याचे (दानाचे) मोठे फळ होते. (२६)

**चक्खुना संवरो साधु साधु सोतेन संवरो ।**
**घाणेन संवरो साधु साधु जिव्हाय संवरो ॥१॥**

चक्षुंचा संयम चांगला, कानांचा संयम चागला,
नाकाचा संयम चांगला, जिभेचा संयम चांगला. (१)

**कायेन संवरो साधु, साधु वाचाय संवरो ।**
**मानसा संवरो साधु, साधु सब्बत्थ संवरो ।**
**सब्बत्थ संवुतो भिक्खु सब्बदुक्खा पमुच्चति ॥2॥**

शरीराचा संयम चांगला, वाचेचा संयम चांगला,
मनाचा संयम चांगला, सर्वत्र संयम चागला,
सर्वत्र संयमाने भिक्खु सर्व वेदनांचे उच्चाटन करतो. (२)

**हत्थसञ्ञतो पादसञ्ञतो वाचाय सञ्ञतो सञ्ञातुत्तमो ।**
**अज्झत्तरतो समाहितो एको सन्तुसितो तमाहु भिक्खुं ॥3॥**

हात संयमितो, पाय संयमितो, वाचा संयमितो, उत्तम संयमितो,
स्वतात रममाण, एकटा मनन करतो, संतुष्ट रहातो, तोच भिक्खु. (३)

**यो मुखसञ्ञतो भिक्खु मन्तभाणी अनुद्धतो ।**
**अत्थं धम्मञ्च दीपेति मधुरं तस्स भासितं ॥४॥**

जो वाणीने संयमि, विचाराने बोलणारा, निर्अहंकारी,
सिद्धांत-अर्थ प्रकाशतो (दाखवतो), त्याचे बोलणे मधुर असते. (४)

**धम्मारामो धम्मरतो धम्मं अनुविचिन्तयं ।**
**धम्मं अनुस्सरं भिक्खु सद्धम्मा न परिहायति ॥५॥**

जो धम्म विहरतो, धम्म रममाण असतो, धम्माचे चिन्तन करतो,
धम्माचे अनुसरण करतो, तो भिक्खु धम्माचा परिहार करीत नाही. (५)

**सलाभं नातिमञ्ञेय्य, नाञ्ञेसं पिहयं चरे।**
**अञ्ञेसं पिहयं भिक्खु समाधिं नाधिगच्छति ॥६॥**

स्वलाभाची अवहेलना करुनये, इतरांची (लाभाची) इर्ष्या करु नये,
इतरांची (लाभाची) इर्ष्या करणारा भिक्खु एकाग्रते कडे जात नाही. (६)

**अप्पलाभोपि चे भिक्खु सलाभं नातिमञ्ञति।**
**तं वे देवा पसंसन्ति सुद्धाजीविं अतन्दितं ॥७॥**

अल्प लाभाने देखील जो भिक्खु स्वलाभाची अवहेलना करीत नाही,
त्या क्रियाशील, शुद्ध जीवी(भिक्खु)ची श्रेष्ठजन प्रशंसा करतात. (७)

**सब्बसो नामरुपस्मिं यस्स नत्थि ममायितं।**
**असता च न सोचति स वे भिक्खु'ति वुच्चति ॥८॥**

सर्व नाम-रुपात (भौतिक जगात) ज्याचा काहींच स्व-अर्थ नाही,
कांहीच नसतानाही जो चिंता करीत नाही, त्याला भिक्खु म्हणतात. (८)

**मत्ताविहारि यो भिक्खु पसन्नो बुद्धसासने।**
**अधिगच्छे पदं सन्तं सङ्खारूपसमं सुखं ॥९॥**

मैत्रीभावाने विहार करणारा, बुद्ध-उपदेशाने प्रसन्न होणारा,
जीवन-क्रियांचे शमन करुन सुखरुप शान्ती पदाला जातो. (९)

**सिञ्च भिक्खु ! इमं नावं सित्ता ते लहुमेस्सति।**
**छेत्वा रागञ्च दोसञ्च ततो निब्बाणमेहसि ॥१०॥**

भिक्खु ! ही होडी रिकामी करा, रिकामी होडी त्वरीत पोचेल,
आसक्ति आणि द्वेष तोडा, त्याने (तुम्हि) निर्वाणाप्रत पोचाल. (१०)

**पञ्च छिन्दे पञ्च जहे पञ्चुत्तरि भावये।**
**पञ्च सङ्गातिगो भिक्खु ओघतिण्णो'ति वुच्चति ॥११॥**

*पाच तोडा, पाच सोडा, पाचांचे उत्तम पालन करा,
पाचांची संगती पार करा, असा भिक्खु 'पुर पार' म्हणविला जातो. (११)

| | |
|---|---|
| * पाच तोडा | - स्वसंकल्पना, संशय, अंधविश्वास, वासनासक्ति, मिथ्याइच्छा, |
| पाच सोडा | - निराकार-आसक्ति, अतिरेक, पश्चाताप, अज्ञान, अभिमान. |
| पाच पालन करा | - प्रज्ञा, श्रद्धा, वीर्य, स्मृति, समाधि. |
| पाच संगत-पार करा | - राग, द्वेष, मोह, अहंकार, मिथ्यादृष्टी. |

झाय भिक्खु ! मा च पमादो मा ते कामगुणे भमस्सु चित्तं ।
मा लोहगुळं गिली पमत्तो मा कन्दि दुक्खमिदन्ति डय्हमानो ॥१२॥

ध्यान ठेव भिक्खु ! भ्रमित-चित्त होणे नको प्रमादात, नको कामगुणात.
प्रमादात (तप्त) लोह-गोळा गिळु नकोस,
जळताना 'हे दुक्ख आहे' असा आक्रोश (तुला) करावा लागु नये. (१२)

नत्थि झानं अपञ्ञस्स पञ्ञानत्थि अझायतो ।
यम्हि झानाञ्च पञ्ञा च स वे निब्बाणसन्तिके ॥१३॥

अप्रज्ञ(मानवा)स चित्त-एकाग्रता नाही, चित्त-एकाग्रता नसेल (तर) प्रज्ञा नाही,
ज्याच्याकडे चित्त-एकाग्रता व प्रज्ञा दोन्ही आहेत तो निर्वाणा जवळ असतो.(१३)

सुञ्ञागारं पविठ्ठस्स सन्तचित्तस्स भिक्खुनो ।
अमानुसो रती होति सम्माधम्मं विपस्सतो ॥१४॥

(शुन्यागारात) एकान्त-घरात प्रवेशणारा भिक्खु शांत चित्त होतो,
सम्यक सिद्धांत पहाणारा (भिक्खु) लोकोत्तर आनंदित होतो. (१४)

यतो यतो सम्मसति खन्धानं उदयब्बयं ।
लभती पीतिपामोज्जं अमतं तं विजानतं ॥१५॥

जसे जसे (मानवाला) स्कन्धांची* उत्पत्ति-विनाश आकलन होतो, (*५ स्कंध पृष्ठ ७४)
(तसे तसे) त्याला प्रेम-प्रसन्नता आणि अमृताची जाण होते. (१५)

तत्रायमादि भवति इधपञ्ञस्स भिक्खुनो ।
इन्द्रियगुत्ति सन्तुट्ठि पातिमोक्खे च संवरो ॥१६॥

प्रज्ञावान भिक्खुने सर्व प्रथम हे केले पाहिजे ....
इन्द्रिय-संयम, सन्तुष्टी, भिक्खु-नियमांचे संयमाचे पालन. (१६)

मित्ते भजस्सु कल्याणे सुद्धाजीवे अतन्द्रिते ।
पटिसन्थारवुत्तस आचारकुसलो सिया ।
ततो पामोज्जबहुलो दुक्खस्सन्तं करिस्ससि ।१७॥

शुद्ध-जीवीका असलेल्या, मंगलकारी, क्रियाशील मित्राची संगत करावी,
मैत्रीपुर्ण सेवा करणारा, कुशल आचार करणारा व्हावे,
त्यातुनच अति-आनन्दित होउन दुक्खाचा अन्त करावा. (१७)

**वस्सिका विय पुप्फानि मद्दवानि पमुच्चति ।
एवं रागञ्च दोसञ्च विप्पमुच्चेथ भिक्खवो ॥१८॥**

जसे चमेली कोमेजलेल्या फुलांना पाडून टाकते,
तसे आसक्ति व द्वेष यांचे उच्चाटन करावे. (१८)

**सन्तकायो सन्तवाचो सन्तवा सुसमाहितो ।
वन्तलोकामिसो भिक्खु उपसन्तोति वुच्चति ॥१९॥**

जो कायेने शान्त, वाचेने शान्त, शान्त-एकाग्र-चित्त,
लौकिक अमिष त्यागलेला आहे, त्या भिक्खुला उपशान्त म्हणतात. (१९)

**अत्तना चोदयत्तानं पटिमासे अत्तमत्तना ।
सो अत्तगुत्तो सतिमा सुखं भिक्खु विवाहिसि ॥२०॥**

जो स्वताचा उदय स्वत: , स्वताचे परिक्षिण स्वत: करतो,
तो आत्मसंयमी, स्मृतीवान भिक्खु सुखात विहरतो. (२०)

**अत्ता हि अत्तनो नाथो अत्ता हि अतत्नो गति ।
तस्मा सञ्ञामयत्तानं अस्सं भद्रवं वाणिजो ॥२१॥**

(मानव) स्वत: स्वताचा स्वामि आहे, स्वत: स्वताची गती आहे,
म्हणुन स्वत:च स्वताला असे संयमित ठेवा जसे व्यपारी उमद्या घोडयाला. (२१)

**पामोज्जबहुलो भिक्खु पसन्नो बुद्धसासने ।
अधिगच्छे पदं सन्तं सङखारूपसमं सुखं ॥22॥**

जो भिक्खु आनन्द-चित्त आहे, बुद्धाच्या शिकवणीने प्रसन्न आहे,
(तो) जीवन-क्रियांचे शमन करुन सुखरुप शान्ती पदाला जातो. (२२)

**यो हवे दहरो भिक्खु युञ्जते बुद्धसासने ।
सो इमं लोकं पभासेति अब्भा मुत्तोव चन्दिमा ॥23॥**

जो भिक्खु तारुण्यात निश्चयाने बुद्धाच्या शिकवणीत सम्मीलीत होतो,
तो आभळ-मुक्त चन्द्रा सारखा या लोकांत प्रकाशमान होतो. (२३)

(संदर्भ - भिक्खुवग्ग - १५) * रुप, वेदना, संज्ञा, संस्कार, विज्ञान हे पाच स्कन्ध.

**छिन्द सोतं परक्कम कामे पनुद ब्राह्मण।**
**संखारानं खयं ञत्वा अकतञ्ञुसि ब्राह्मण ॥१॥**

हे ब्राह्मणा ! स्त्रोत तोडुन टाक, प्रयत्नाने कामना दुर कर,
भौतिकतेचा क्षय करुन अकृताचा (अभिभौतिकतचा) जाणकार हो, ब्राह्मणा ! (१)

**यदा द्वयेसु धम्मेसु पारगू होति ब्राह्मणो।**
**अथस्स सब्बे संयोगा अत्थं गच्छन्ति जानतो ॥ 2॥**

जेंव्हा ब्राह्मण दोन *स्वभाव-गुणांत पारंगत होतो,
त्या ज्ञनीची सर्व बंधने विनाशाकडे जातात.(विनाश पावतात) (२)

**यस्स पारं अपारं वा पारापारं न विज्जति।**
**वीतद्दरं विसञ्ञुत्तं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥ 3॥**

ज्याचा पार, अपार, परापार असत नाही,
जो निर्भय, निर्बंध आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३)

**झायिं विरजमासीनं कतकिच्चं अनासवं।**
**उत्तमत्थं अनुपत्तं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥४॥**

जो ध्यनी, निर्मळ, कृतकृत्य, स्त्रोतहीन आहे,
ज्याने उत्तम अर्थ (परम् अर्थ) प्राप्त केला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (४)

**दिवा तपति आदिच्चो रत्तिं आभाति चन्दिमा।**
**सन्नद्धो खत्तियो तपति झायी तपति ब्राह्मणो।**
**अथ सब्बमहोरत्तं बुद्धो तपति तेजसा ॥५॥**

दिवसा सुर्य तळपतो, रात्री चन्द्र प्रकाशतो,
सशस्त्र क्षत्रिय तळपतो, ध्यानमग्न ब्राह्मण तळपतो,
पण बुद्ध आपल्या तेजाने सर्व दिवस-रात्र तळपत असतात. (५)

* दोन स्वभाव-गुण = १. चित्त-संयम, २. विपश्यना (आत्म-दर्शन)

**वाहितपातपोति ब्राह्मणो समचरिया समणोति वुच्चति।**
**पब्बाजयमत्तनो मलं तस्मा पब्बजितोति वुच्चति ॥६॥**

ज्याचे दुष्कर्म वाहुन गेले आहेत तो ब्राह्मण, आचरण सम्यक आहे तो श्रमण,
ज्याने चित्त-दोष दूर सारले आहेत तो प्रवज्जित म्हणविला जातो. (६)

**न ब्राह्मणस्स पहरेय्य नास्स मुञ्चेथ ब्राह्मणो।**
**धि ब्राह्मणस्स हन्तारं ततो धि यस्स मुञ्चति ॥७॥**

ब्राह्मणावर प्रहार करु नये, ब्राह्मणाने त्याच्यावर कोप करु नये,
ब्राह्मणाची हत्या करणाऱ्याचा धिक्कार, त्यापेक्षा त्याच्यावर कोपणाऱ्याचा धिक्कार. (७)

**न ब्राह्मणस्सेतदकिञ्चि सेय्यो यदा निसेधो मनसो पियेहि।**
**यतो यतो हिंसमनो निबत्तति ततो ततो सम्मतिमेव दुक्खं ॥८॥**

मनाला प्रिय असलेल्याचा निषेध, हे (ही गोष्ट) ब्राह्मणाला कमी श्रेष्ठ नाही,
जस जसे मन हिंसा-निवृत्त होते, तस तसे दुक्खाचे शमन होते. (८)

**यस्स कायेन वाचाय मनसा नत्थि दुक्कतं।**
**संवुतं तीहि ठानेहि तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥९॥**

ज्याच्या कायेने, वाचेने, मनाने दुष्कृत्य केलेले नाही,
या तीन्ही ठिकाणी जो संयमित आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (९)

**यम्हा धम्मं विजानेय्य सम्मासम्बुद्धदेसितं।**
**सकच्चं तं नमस्सेय्य अग्गिहुत्तंव ब्राह्मणो ॥१०॥**

सम्यक सम्बुद्धाने उपदेशिलेला सिद्धांत ज्याच्याकडुन जाणुन घेतला,
त्याला तसाच दक्षतेने नमस्कार करावा जसा ब्राह्मण अग्निहोत्राला करतो. (१०)

**न जटाहि न गत्तेहि न जच्चा होति ब्राह्मणो।**
**यम्हि सच्चञ्च धम्मो च सो सुची सो च ब्राह्मणो ॥११॥**

ना जटेने, ना गोत्राने, ना जन्माने, ब्राह्मण होतो,
ज्याच्यात सत्यता, सदाचार, शुचिता असते तो ब्राह्मण. (११)

**किं ते जटाहि दुम्मेध ! किं ते अजिनसाटिया ।**
**अब्भन्तरं ते गहणं बाहिरं परिमज्जसि ॥१२॥**

हे दुर्बुद्ध (मानवा)! या जटा कशाला ? हे व्याघ्र-वस्त्र कशाला ?
आतुन गडद (मळलेला) आहेस, बाहेरुन घासती (धुती) आहीस. (१२)

**पंसुकूलधरं जन्तु किसं धमनिसन्थतं ।**
**एकं वनस्मिं झायन्तं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥१३॥**

जो चिंध्या धारण केलेला जीव, ज्याच्या धमन्या दिसत आहेत,
एकटा वनात ध्यानस्थ आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (१३)

**न चाहं ब्राह्मणं ब्रुमि योनिजं मत्तिसंभवं ।**
**'भो वादी' नाम सो होति स च होति सकिञ्चनो ।**
**अकिञ्चनं अनादानं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥१४॥**

ब्राह्मण मातेच्या योनीतुन उत्पन्न झाला त्याला मी ब्राह्मण म्हणत नाही,
त्याला 'भो' (सन्माननीय संबोधन) संबोधतात, जो 'कांही' बाळगुन असतो.
जो कांहीही बाळगुन नाही, कांहीही घेत नाही, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (१४)

**सब्बञ्ञोजनं छेत्वा यो वे न परितस्सति ।**
**सङ्गातिगं विसञ्ञूतं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥१५॥**

सर्व बंधने तोडुनही ज्याला चिन्ता वाटत नाही,
ज्याने सर्व संगती (पाश) विभक्त केले आहेत, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (१५)

**छेत्वा नद्धिं वरतञ्च सन्दानं सहनुक्कमं ।**
**उक्खित्तपलिघं बुद्धं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥१६॥**

दोऱ्या, पट्टे, सारवळ्या तोडुन, (गाडी जुंपतात ते) जु झिडकारुन,
जो बाधारहीत होउन बुद्ध होतो, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (१६)

**अक्कोस वधबन्धञ्च अदुट्ठो यो तितिक्खति ।**
**खन्तिबलं बलानीकं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥१७॥**

शिव्या, दण्ड, बन्धन, यांना जो अदृष्टपणे (चांगुलपणाने) सहन करतो,
क्षमा-शक्ति हीच ज्याची प्रबळ-सेना आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (१७)

अक्कोधनं वतवन्तं सीलवन्तं अनुस्सदं ।
दन्तं अन्तिमसारीरं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ १८॥

जो अक्रोधी, व्रतस्थ, शीलवान, स्वल्प (विकार नाही) आहे,
जो संयमित, अन्तिम-शरीरी आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (१८)

वारिपोक्खरपत्तेव आरग्गेरिव सासपो ।
यो न लिम्पति कामेसु तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥१९॥

कमळ पानावर जलबिंदु वा सुईच्या टोकावर मोहोरी,
तसा कामनांशी जो चिकटुन रहात नाही, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (१९)

यो दुक्खस्स पजानाति इधेव खयमत्तनो ।
पन्नभारं विसञ्ञुत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥ २०॥

जो आपल्या दुक्खाचा क्षय इथेच स्पष्ट जाणतो,
जो भारमुक्त, बंधमुक्त (आहे), त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२०)

गम्भीरपञ्ञं मेधावी मग्गामग्गस्स कोविदं ।
उत्तमत्थं अनुपत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२१॥

जो गंभीर-प्रज्ञ, सुजाण, मार्ग-अमार्गाचा सुज्ञ आहे,
ज्याला उत्तम अर्थ प्राप्त झाला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२१)

असंसट्ठं गहट्ठेहि अनागरेहि चुभयं ।
अनोकसारिं अप्पिच्छं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२२॥

जो गृहस्थ व गृहहीन दोहो पासुनही अलिप्त आहे,
जो घरापासुन दूर, निरीच्छ आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२२)

निधाय दण्डं भुतेसु तसेसु थावरेसु च ।
यो न हन्ति न घातेति तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥२३॥

जो चर-अचर प्रण्यांना दण्डित करण्या पासुन अलिप्त असतो,
जो ना मारतो ना घात करतो, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२३)

**अविरुद्धं विरुद्धेसु अत्तदण्डेसु निब्बुतं ।
सादानेसु अनादानं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥24॥**

विरोधकांत अविरोधी, दण्डधारींमधे शांत,
ग्रहणकर्त्यांत अग्रहणकारी, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२४)

**यस्स रोगो च दोसो च मानो मक्खो च पातितो ।
सासपोरिव आरग्गा तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥25॥**

ज्याच्या (चित्तातुन) मोह, द्वेष, मान, अहंकार, मत्सर निखळला आहे,
जसे सुईच्या टोकावरुन मोहोरी (निखळावी), त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२५)

**अक्कसं विञ्ञापनिं गिरं सच्चं उदीरये ।
याय नाभिसजे कञ्चि तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥26॥**

जो कर्कश (अप्रिय) न बोलता सत्य वचन बोलतो,
ज्याने (या बोलण्याने) कुणीही क्रोधित होत नाही, त्याला मी ब्राह्मण म्हणतो.(२५)

**योध दीघं वा रस्सं वा अणु थुलं सुभासुभं ।
लोके अदिन्नं नादयति तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥27॥**

लांब वा अखुड, लहान वा मोठी, चांगली वा वाइट,
जो (जोवर) कुणी दिलेली नाही, (तोवर ती वस्तु, गोष्ट) घेत नाही,
(चोरी करीत नाही) त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२७)

**आसा यस्स न विज्जन्ति अस्मिं लोके परम्हि च ।
निरासयं विसंयुत्तं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥ 28॥**

ज्याला या लोकांत व दुसऱ्या लोकात (कसलीही) आशा असत नाही,
जो निरीच्छ, निर्बंध आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२८)

**यस्सालया न विज्जन्ति अञ्ञाय अकंथकथी ।
अमतोगधं अनुप्पत्तं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥29॥**

ज्याच्या (मनात) इतरांचा संशयाचे कांहीही निमित्त असत नाही,
ज्याला आगाध अमृताची प्राप्ति झाली आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (२९)

योध पुञ्ञञ्च पापञ्च उभो सङ्गं उपच्चगा।
असोकं विरजं सुद्धं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३०॥

ज्याने सत्कर्म व दुष्कर्म दोहोंच्या इच्छा पार केल्या आहेत,
जो शुद्ध व शोकरहीत आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३०)

चन्दवं विमलं सुद्धं विप्पसन्नमनाविलं।
नन्दीभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३१॥

जो चन्द्रा सारखा निर्मळ, शुद्ध सुस्पष्ट व स्वच्छ (मनाचा) आहे,
ज्याचा मोद-भाव अतिक्षीण झाला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३१)

यो इमं पलिपथं दुग्गं संसारं मोहमच्चगा।
तिण्णो पारगतो झायी अनेजो अकंथकथी।
अनुपादाय निब्बुतो तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३२॥

ज्याने हा धोकादायक व दुर्गम संसार-मोह ओलांडला आहे,
ध्यानधारणेत उत्तीर्ण, तृष्णेच्या पार गेलेला, निःसंशयी,
ज्याच्या निवृत्तीला कारण नाही, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३२)

योध कामे पहत्वान अनागारो परिब्बजे।
कामभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३३॥

जो वासनांचा निःपात करुन बेघर होउन प्रवज्जित झाला आहे,
ज्याचा वासना-भाव अतिक्षीण झाला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३३)

योधं तण्हं पहत्वान अनागारो परिब्बजे।
तण्हाभवपरिक्खीणं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३४॥

जो तृष्णांचा निःपात करुन बेघर होउन प्रवज्जित झाला आहे,
ज्याचा तृष्णा-भाव अतिक्षीण झाला आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३४)

हित्वा मानुसकं योगं दिब्बं योगं उपच्चगा।
सब्बयोगविसंयुत्तं तमहं ब्रूमि ब्राह्मणं ॥३५॥

ज्याने मानवी संबंध तोडले आहेत, जो दिव्य संबंधांच्या पार गेला आहे,
जो सर्व संबंधांपासुन परावृत्त आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३५)

हित्वा रतिञ्च अरतिञ्च सीतीभुतं निरुपधिं ।
सब्बलोकाभिभुं वीरं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥३६॥

जो प्रीती आणि अप्रीती सोडुन, शांत-भाव प्राप्त, क्लेशहीन आहे,
ज्या वीराने सर्व लोकांना जिंकले आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३६)

चुति यो वेदि सत्तानं उपपत्तिञ्च सब्बसो ।
असत्तं सुगतं बुद्धं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥३७॥

जो सर्व प्रणिमात्रांची उत्पत्ति आणि अंत जाणतो,
जो अनासक्त, सन्मार्गावर आहे, सुज्ञानी आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३७)

यस्स गतिं न जानन्ति देवा गन्धब्बमानुसा ।
खीणासवं अरहन्तं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥३८॥

ज्याची गती देव, गंधर्व, मानव (कुणीही) जाणीत नाहीत,
ज्याचे स्त्रोत क्षीण झाले आहेत, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३८)

यस्स पुरे च पच्छा च मज्झे च नत्थि किञ्चनं ।
अकिञ्चनं अनादानं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥३९॥

ज्याचे पुर्वी, आता, पुढेही कांहीच (भौतिक वस्तुमात्र) नाही,
जो कांहीही बाळगुन नाही, कांहीही घेत नाही, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (३९)

उसभं पवर वीरं महेसिं विजीताविनं ।
अनेजं नहातकं बुद्धं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥४०॥

जो वृषभ (सशक्त), श्रेष्ठ, वीर, महर्षि, विजेता आहे,
तृष्णाहीन, स्नात, सुज्ञानी आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (४०)

पुब्बेनिवासं यो वेदि सग्गापायञ्च पस्सति ।
अथो जातिक्खयं पत्तो अभिञ्ञावोसितो मुनि ।
सब्बवोसितवोसानं तमहं ब्रुमि ब्राह्मणं ॥४१॥

जो पुर्व-स्थान जाणतो, स्वर्ग व नरक पहातो,
ज्याचे (पुर्न)जीवन-क्षीण झाले आहे, जो प्रज्ञावान, मननी आहे,
जो सद्-जीवन समाप्त (निर्वाण प्राप्त) आहे, त्याला मी ब्राह्मण म्हणतो. (४१)

## बुद्धवग्ग - १२,१३,१४,१५ (ब्राम्हिलिपी)



मुखपृष्ठ : सिओकगुरम शाक्यमुनी, दक्षिण कोरिया.

Cover Photo : Seokguram Shakyamuni, South Korea.

* * * * * * * *